

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३८ । अंक १० । जुलै १९८५
किंमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–



**अध्यक्ष व विश्वस्त**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी



**संपादक**

मे. पुं. रेगे

**साहाय्यक संपादक**

अ. र. कुलकर्णी, एस. डी. इनामदार,
अ. ना. ठाकूर.

**संपादकीय पत्रव्यवहार :**

मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**

श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले.

अनुक्रमणिका








# नवभारत

९/१७/१७८५

जुलै १९८५

## अनुक्रम



## लेखक–परिचय


■ **सु. र. देशपांडे :** मराठी विश्वकोशात इतिहास, राज्यशास्त्र, पुरातत्त्वविद्या इ. विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **व. त्रि. चिपळोणकर :** निवृत्त प्राध्यापक, भौतिकी विभाग, 'इन्स्टिटयूट ऑफ सायन्स,' मुंबई. निवास : फ्लॅट नं. १०६, अभिनव अपार्टमेंटस्, ९९६, नवी पेठ, पुणे–४११ ०३०. ■ **मधुकर जोशी :** डॉ. मधुकर जोशी हे गेली २५ वर्षे अमेरिकेत वास्तव्य करीत आहेत. डॉ. जोशी अमेरिकेतील इंटरनॅशनल बिझनेशन मशिन्स या आंतरराष्ट्रीय किर्तीच्या कंपनीत वरिष्ठ पदावर संशोधन-कार्य करीत आहेत. पत्ता – डॉ. मधुकर जोशी, ९ वॉल्डन उड्स, स्टार रूट, इसेक्स जंक्सन, वर्मॉन स्टेट, अमेरिका. ■ **अशोक दा. रानडे :** विख्यात संगीतज्ञ; साहाय्यक संचालक, 'नॅशनल सेंटर फॉर द परफॉर्मिंग आर्टस्' मुंबई. निवास : ७ ज्ञानदेवी, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–४०० ०५१. ■ **बा. रं. सुंठणकर :** महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे भूतपूर्व मानसेवी संपादक; ८, प्रशांत सहकारी सोसायटी, पौड रस्ता, कोथरूड, पुणे–४११ ०२९. ■ **अशोक भट :** विधिज्ञ आणि सामाजिक कार्यकर्ते, मधली आळी, वाई–४१२ ८०३. ■ **गं. ब. ग्रामोपाध्ये :** मराठी समीक्षक व मराठीचे सेवानिवृत्त प्राध्यापक, १, भारद्वाज, डॉ. पिसुर्लेकर मार्ग, पणजी (गोवा). ■ **ना. बा. मराठे :** निवृत्त संपादक, 'इंडियन नॅशनल बिब्लिऑग्राफी, सेंट्रल रेफरन्स लायब्ररी,' बेल्व्हेदेर, कलकत्ता, धर्मकोशाचे विशेष कार्यकर्ते, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई–४१२ ८०३.


० ० ०

# संपादकीय

## धार्मिक सनातनवाद

धार्मिक सनातनवादाची (फन्डॅमेन्टॅलिझम) लाट इस्लामी देशांत आज उसळली आहे आणि तिचे पडसाद भारतातही उमटत आहेत, अशी भीती अनेकदा व्यक्त करण्यात येते. ह्या भीतीशी निगडित असलेली दुसरी भीती अशी की, ह्या लाटेची प्रतिक्रिया म्हणून किंवा स्वतंत्रपणे हिंदू समाजामध्येही सनातनवाद उसळून येत आहे आणि ह्याचे भारतीय समाजाच्या प्रगतीवर विपरीत परिणाम घडून येत आहेत आणि येणार आहेत. भारतातील मुसलमान समाज धार्मिक सनातनवादाच्या किंवा पुनरुज्जीवनवादाच्या आहारी गेला तर, ते केव्हाही अनिष्टच ठरेल. पण मुसलमान समाज भारतात अल्पसंख्य आहे. बहुसंख्य असलेला हिंदू समाजच धार्मिक सनातनवादाला बळी पडला तर, सबंध राष्ट्राच्या प्रगतीलाच खीळ पडल्यासारखे होईल.

हिंदू सनातनवादाचा आविष्कार म्हणून काही घटनांचा उल्लेख करण्यात येतो. उदा. 'जागृत' देवस्थानांपुढील भक्तांच्या वाढत्या रांगा; थाटामाटात, डामडौलात होणारे गणेशोत्सव, दुर्गापूजा, नवरात्र इ. धार्मिक उत्सव; ह्यांची संख्या, व्याप्ती, कालावधी आणि दिमाख यांच्यांत गेल्या काही वर्षांत लक्षणीय वाढ झाली आहे. दलितांवर वाढत्या प्रमाणात होणारे अत्याचार; 'हिंदू एकता' इ. आंदोलने आणि 'आम्ही हिंदू आहोत ह्याचा आम्हाला अभिमान आहे' ह्या स्वरूपाच्या ऐकू येणाऱ्या घोषणा. तेव्हा धार्मिक सनातनवादाचे सामान्य स्वरूप काय असेल आणि हिंदू सनातनवादाचे विशिष्ट स्वरूप काय असेल, ह्या प्रश्नांचा विचार करणे उपयुक्त ठरेल.

इस्लामी सनातनवादाचे स्वरूप समजून घेणे एका अर्थाने सोपे आहे. कारण हिंदू धार्मिक परंपरेमध्ये जी गुंतागुंत आहे, ती इस्लामी परंपरेत नाही. इस्लामी परंपरेत पंथभेद असले तरी, तुलनेने ती कितीतरी अधिक एकसंध आहे. आज एखादा मुसलमान असे म्हणू शकेल की, "मी मुसलमान आहे आणि हे माझ्या विषयीचे मूलभूत आणि संपूर्ण सत्य आहे. (किंवा तो अयातुल्ला खोमिनी ह्यांचा अनुयायी असला तर तो असे म्हणेल की, मी शिया मुसलमान आहे आणि हे माझ्या विषयीचे मूलभूत आणि संपूर्ण सत्य आहे.) महंमद हे ईश्वराचे शेवटचे प्रेषित आहेत आणि ईश्वराने त्यांना प्रकट केलेले पवित्र कुराण शब्दशः सत्य आहे. ही विधाने मी सत्य म्हणून श्रद्धेने स्वीकारतो. पवित्र कुराणापासून आणि प्रेषितांविषयीच्या परंपरेने आलेल्या स्मृतींपासून–हदिसपासून–, माणसाला इहलोकीचे आणि परलोकीचे संपूर्ण श्रेय प्राप्त करून देणाऱ्या जीवनमार्गाचे ज्ञान होते असे मी मानतो. ह्या मार्गाने जगणे हे मुसलमान म्हणून माझे कर्तव्य आहे; आणि ह्या मार्गाने जगूनच मला माझे अंतिम श्रेय साधता येईल अशी माझी श्रद्धा आहे. पवित्र कुराणातील वचनांचा अर्थ लावण्याची जी पद्धती प्रमाण म्हणून पवित्र कुराणात किंवा हदिसमध्ये नेमून दिलेली असेल तिला अनुसरूनच मी त्यांचा अर्थ लावतो. माणसांना स्वतंत्र बुद्धीने निर्णय घेण्यासाठी जेवढी जागा ह्या धर्मग्रंथांनी मोकळी ठेवली असेल तेवढ्या मर्यादेतच मी असे निर्णय घेईन. ज्या बाबतींत कुराण आणि हदिस यांचे नियमन मान्य करावे लागते असे ह्या धर्मग्रंथांत म्हटले असेल त्या बाबतींत मी त्यांचे नियमन श्रद्धेने स्वीकारीन. मी असे वागलो नाही तर, मी मुसलमान नाही असे होईल. पण मी मुसलमान आहे."

एकेकाळी, उदा. सोळाव्या शतकात, मुसलमान सरळपणे श्रद्धावान होते. ते मुसलमान म्हणून स्वाभाविकपणे जगत. आणि श्रद्धाळू मुसलमान म्हणून जगत असताना, नव्याने उद्भवलेल्या सामाजिक

अनुक्रमणिका






आणि वैयक्तिक प्रश्नांना तोंड देताना, अपरिचित परिस्थितीशी मुकाबला करीत असताना, त्यांच्या पारंपरिक श्रद्धेच्या आशयात स्वाभाविकपणे बदलही होत असे असा तर्क करता येईल. उलट आज अनेक मुसलमानांना हट्टाने, आग्रहाने आपण मूलत: मुसलमान आहोत असे स्वतःला आणि इतरांना सांगावे लागत असणार. श्रद्धाळू मुसलमान असणे ही त्यांची स्वाभाविक प्रकृती नसते. ती त्यांनी जाणीवपूर्वक स्वतःसाठी निवडलेली भूमिका असते आणि ती ते वठवीत असतात. ( अर्थात् सरळपणे, स्वाभाविकपणे श्रद्धाळू असलेलेही अनेक मुसलमान आहेत. ते अशिक्षितांत आढळतील.)

सुशिक्षित मुसलमानांची एकेकाळची स्वाभाविक इस्लामी श्रद्धा आणि श्रद्धाळू मुसलमान ही त्यांतील काहीजणांनी आज स्वीकारलेली आग्रही भूमिका ह्यात भेद आहे. गेल्या चार शतकांत युरोपमध्ये जे मूलभूत वैचारिक, सांस्कृतिक आणि सामाजिक परिवर्तन झाले आणि ज्याचे लोण जगभर पसरले, त्याच्याशी हा भेद संबंधित आहे. 'आधुनिक' संस्कृतीचा उदय आणि स्थिरीकरण असे ह्या परिवर्तनाचे थोडक्यात वर्णन करता येईल.

वैज्ञानिक ज्ञानाचा विस्तार आणि त्यातून विश्वाच्या घडणीचे उभे राहिलेले चित्र हा ह्या संस्कृतीचा एक महत्त्वाचा घटक आहे. पण वैज्ञानिक विचारपद्धतीला आधारभूत असलेला चिकित्सक दृष्टिकोण हाही तितकाच महत्त्वाचा घटक आहे. श्रद्धेची जागा चिकित्सेने आणि विवेकाने (रीझन) घेतली. परंपरेने चालत आलेल्या समजुती—ईश्वराविषयीच्या, आत्म्याविषयीच्या, सृष्टीविषयीच्या—; नीति-अनीती, पाप-पुण्य, धर्म-अधर्म, ह्याविषयींच्या संकल्पना, सामाजिक संस्थांची घडण आणि त्यांची साध्ये, जीवनाच्या श्रेयाची कल्पना आणि जीवनाचे आदर्श, न्यायाचे तत्त्व ह्या सर्वांचे परीक्षण करण्याचा आपला अधिकार व्यक्तींनी कमावला. श्रद्धेने जे स्वीकारले असेल आणि परंपरेने जे चालत आलेले असेल ते विवेकाच्या निकषांवर टिकत असेल, तरच त्याचे प्रामाण्य आपण मान्य करू ही वृत्ती स्थिर झाली. (अर्थात् हे विवेकनिष्ठ निकष कोणते आणि त्यांची विवेकनिष्ठता कशी सिद्ध करायची ह्या प्रश्नांची उत्तरेही विवेकानेच द्यायची आहेत.)

व्यक्तीचे विचारस्वातंत्र्य आणि तिचा आत्मप्रत्यय हा ह्या चिकित्सेचा पाया आहे. ह्या विचारस्वातंत्र्याचा आणि आत्मप्रत्ययाचा आविष्कार केवळ चिकित्सेत झाला नाही. संस्कृतीच्या सर्व क्षेत्रांत अभूतपूर्व अशा नवनिर्मितीच्या स्वरूपातही तो झाला. केवळ विज्ञानात आणि तंत्रज्ञानात नव्हे, तर साहित्यात आणि ललितकलांत, वास्तुकलेत आणि शिल्पकलेत, वेषभूषा आणि सुखोपभोगाचे प्रकार ह्यांच्यांतही निर्मितीला बहर आला. सर्व मानवी प्रेरणा, प्रवृत्ती आणि शक्ती मुक्त, अप्रतिहत आविष्कारासाठी मोकळ्या झाल्या.

भौतिक जगाचा शोध घेताना माणसे मानवी जगाचा, सामाजिक वास्तवाचा आणि मानवी संस्कृतीचा शोध घेऊ लागली. माणसांना मानवी संस्कृतीचा इतिहास पहिल्यांदाच गवसला. आणि म्हणून युरोपीय माणूस स्वतःच्या विशिष्ट सांस्कृतिक परंपरेकडेही दूरस्थपणे पहायला लागला. एका बाजूने दूरस्थपणे, दुसऱ्या बाजूने त्या विशिष्ट परंपरेचा घटक व निर्मिती म्हणून. उदा. मरणाऱ्या आणि पुनरुत्थान पावणाऱ्या देवाची कल्पना, किंवा देवाच्या शरिराचे भक्षण आणि रक्ताचे प्राशन करण्याचा विधी, ह्या ख्रिस्ती धर्मश्रद्धेला विशिष्ट असणाऱ्या गोष्टी नव्हत, त्या अनेक धार्मिक परंपरांत भिन्न स्वरूपात अंतर्भूत आहेत हा शोध लागला. स्वतःच्या सांस्कृतिक परंपरेचे विशिष्टत्व आणि आणि त्याच्यातून व्यक्त होणारा सार्वत्रिक, प्रमाण मानवी आशय ह्यांचा मेळ कसा घालायचा हा नवीन प्रश्न माणसापुढे आला.

ह्या सांस्कृतिक परिवर्तनाला आणि उत्थानाला एक सामाजिक बाजू होती. विज्ञान आणि तंत्रज्ञान ह्यांच्या विकासातून निसर्गशक्तींवर मिळालेला काबू, आणि निर्माण झालेली साधनसामग्रीची संपन्नता ह्यांच्यावर आधारलेला माणसाचा आत्मविश्वास समाजाच्या खालच्या, दडपलेल्या थरांत झिरपू लागला;

सगळ्यांनाच आपल्या 'मानवी अधिकारां'ची जाणीव झाली. कामगार, श्रमिक, स्त्रिया व्यक्तिस्वातंत्र्या-वर सामाजिक व्यवस्थापनाच्या व संस्कृतीच्या सर्व क्षेत्रांत समान सहभागावर हक्क सांगू लागल्या. समानतेच्या पायावर समाजाची नव्याने घडी बसविली पाहिजे. ही त्यांची मागणी नाकारणे अशक्य होऊ लागले.

भौतिक विज्ञान आणि तंत्रज्ञान ह्यांच्या बळावर युरोपने सोळाव्या ते एकोणिसाव्या शतकापर्यंत युरोपेतर जग व्यापले किंवा पादाक्रांत केले. इतर प्रदेशांतील समाजांवर त्यांची साक्षात् राजकीय सत्ता असो, नसो, त्यांची अधिसत्ता होती, ह्यात शंका नाही. हिंदू, चिनी, इस्लामी, इ. प्राचीन, अभिमानी संस्कृतींचा हा मोठाच पराभव होता. विजेत्या, विजयाने उन्मत्त झालेल्या पाश्चात्त्य संस्कृतीला योग्य प्रतिसाद कोणता हा त्यांच्यापुढील प्रश्न होता. माणसाच्या सर्व शक्तींना मोकळी वाट देणाऱ्या एका अभूतपूर्व संस्कृतीची निर्मिती ही युरोपीय समाजांची उज्ज्वल बाजू होती. तिच्यापासून लाभलेल्या बळाचा उन्माद, स्वतःच्या श्रेष्ठत्वाचा दर्प ही तिची काळी बाजू होती.

हिंदू समाजातील विचारवंतांच्या एका विभागाने पाश्चात्त्य संस्कृतीचे आंतरिक मूल्य ओळखले. ही केवळ एक बलिष्ठ संस्कृती नव्हे तर उच्चतर पातळीवरील श्रेष्ठ मानवी संस्कृती आहे, मानवी संस्कृतीचे हे श्रेष्ठतर रूप आहे, हे त्यांनी जाणले. मानवी प्रकृतीवर आधारलेल्या सार्वत्रिक मूल्यांच्या, बौद्धिक, नैतिक, सौंदर्यात्मक, आध्यात्मिक मूल्यांच्या निकषावरच तिचे श्रेष्ठत्व प्रतीत होते आणि म्हणून तिचा आदराने स्वीकार केला पाहिजे, 'स्वत्व' न सोडता, 'भारतीय आर्यत्व' हरवून न बसता तिच्यातील प्रेरणा आणि तत्त्वे आत्मसात केली पाहिजेत, ह्या दृष्टीने त्यांनी तिच्याकडे पाहिले. ह्या 'भारतीय आर्यत्वा'चा किंवा हिंदू समाजाच्या अस्मितेचा आशय काय होता हा अर्थात् एक कूट प्रश्न होता आणि त्याची अनेक भिन्न उत्तरे देता येणे शक्य होते. दुखावलेली अस्मिता कुरवाळीत बसण्यात पुरुषार्थ नाही हे जाणण्याचा शहाणपणा त्यांच्यात होता.

हा समंजस प्रतिसाद हिंदू विचारवंत देऊ शकले, कारण हिंदू बौद्धिक संस्कृतीमध्ये प्रगल्भ बौद्धिक आणि नैतिक मूल्यांचा परिपोष झाला होता.

आज कुणीही 'मी मुसलमान आहे आणि म्हणून मी श्रद्धेने कुराण आणि हदिस यांच्यावर आधारलेल्या मुसलमान परंपरेला अनुसरून जगणार' असे जेव्हा म्हणतो तेव्हा तो जाणीवपूर्वक आधुनिक माणसाच्या ह्या सांस्कृतिक वारशाकडे पाठ फिरवीत असतो. आजही असे अनेक मुसलमान आहेत, की ज्यांच्यापर्यंत आधुनिक संस्कृती पोचलेलीच नाही. ते पारंपरिक मुस्लिमश्रद्धेला अनुसरून जगत असणार. पण आपण इस्लामी श्रद्धेला अनुसरून जगणार अशी प्रतिज्ञा घेण्याचे कारण त्यांनी नसते. जे अशी प्रतिज्ञा घेतात त्यांचा आधुनिक संस्कृतीशी परिचय असतो आणि ह्या संस्कृतीचा ते अव्हेर करीत असतात.

ह्या अव्हेराचा अर्थ काय असेल? समजा इस्लाम काही कारणाने चित्रकला किंवा मूर्तिकला निषिद्ध मानीत असला तर आधुनिक श्रद्धाळू मुसलमान ह्या गोष्टी वर्ज्य मानील. मानवी निर्मितीच्या एका अद्‌भुत दालनाचे दरवाजे तो बंद करील. एका उत्कट, निरागस आनंदापासून तो स्वतःला निष्कारण वंचित करील. श्रद्धाळू मुसलमान व्यक्ती स्त्री असली आणि इस्लाममध्ये स्त्री पुरुषापेक्षा कनिष्ठ आहे असा सिद्धांत असला तर ती स्वतःची स्वायत्तता, मोकळेपणे जगण्याचे स्वातंत्र्य नाकारील. इस्लामी परंपरेत स्त्रियांवर जी बंधने असतील ती आपण होऊन स्वीकारील. उदा. पडद्याची चाल पाळावी असा इस्लामचा आदेश असेल तर त्याचे ती पालन करील. श्रद्धाळू व्यक्ती स्त्री किंवा पुरुष असो धार्मिक संकल्पनांची, प्रतीकांची, विधींची उत्क्रांती कशी झाली आहे ह्याविषयीचे सर्व आधुनिक शास्त्र तिला अमान्य करावे लागेल, त्याच्याकडे डोळेझाक करूनच इस्लामी श्रद्धेचा स्वीकार करावा

लागेल. आज ज्यांना इस्लामी श्रद्धेकडे परत वळायचे असेल त्यांना स्वतःच्या बौद्धिक, नैतिक, कलात्मक प्रेरणांना खंडित करूनच त्या श्रद्धेचा स्वीकार करता येईल.

ही इस्लामी श्रद्धेपुढीलच अडचण आहे असे नव्हे. ती कोणत्याही पारंपरिक श्रद्धेपुढील अडचण आहे. मध्ययुगातील युरोपीय कॅथलिक ज्या अर्थाने श्रद्धाळू होता त्या अर्थाने आजचा कॅथलिक श्रद्धाळू असू शकत नाही. वैज्ञानिक ज्ञान, वैज्ञानिक विचारपद्धती, विचारस्वातंत्र्य, मानवी संस्कृतीच्या इतिहासाचे ज्ञान, ह्यांच्या पार्श्वभूमीवर आजच्या कॅथलिक पंथीयाला आपल्या श्रद्धेचा अर्थ लावावा लागतो.

इस्लामी सनातनवादाची व्याख्या मग अशी करता येईल. आधुनिक ज्ञान आणि मूल्ये ह्यांना नाकारून पारंपरिक इस्लामी श्रद्धेचा अवलंब करणे (किंवा करण्याचा प्रयत्न करणे) हा इस्लामी सनातनवाद होय. हिंदू सनातनवादाची अशीच समांतर व्याख्या करता येईल.

आज सनातनवादाचा स्वीकार करण्याने माणसे स्वतःलाच खंडित करीत असतात, स्वतःवर निष्कारण बंधने घालून घेऊन स्वतःचे जीवन खुरटे बनवीत असतात हे आपण पाहिले. कोणत्या मोहापायी, भीतीपायी माणसे असे वागतात हे समजून घेणे आज अनिवार्य झाले आहे.





अनुक्रमणिका








# एक थोर इतिहाससंशोधक

## सु. र. देशपांडे



कै. ग. ह. खरे

प्रतिभावान विद्वान अभ्यासकांच्या परंपरेत प्रदीर्घ निरलस व्यासंगाने शोभणारे आणि इतिहास संशोधनाला जीवनसर्वस्व वाहणारे प्रा. ग. ह. ऊर्फ तात्यासाहेब खऱ्यांचे जीवन हे पूर्णतः एकाकी ब्रह्मचाऱ्याचे होते. त्यांनी प्रपंच उभा केला तो असंख्य ऐतिहासिक कागदपत्रांचा, साधनांचा आणि नाण्यांचा. त्यांनी इतिहास संशोधन क्षेत्रात वयाच्या २९ व्या वर्षी पदार्पण केले आणि त्या वेळेपासून त्यांचा एकच ध्यास होता. तो म्हणजे काहीतरी नवीन शोधणे, संशोधन करणे. याच संशोधकाच्या खुर्चीत भारत इतिहास संशोधक मंडळाचे कार्याध्यक्ष म्हणून काम करीत असताना त्यांना ५ जून १९८५ रोजी मृत्यूने गाठले.

प्रा. खरे हे मूळचे वाईचे. एका मध्यमवर्गीय कुटुंबात जन्माला आलेले. त्यांचा जन्म पनवेल येथे आजोळी १० जानेवारी १९०१ रोजी झाला. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण पनवेल, वाई, बेळगाव येथे झाले. काही महिने त्यांनी वाईच्या प्राज्ञपाठशाळेत विनोबा भावे यांच्या मार्गदर्शनाखाली भगवद्गीता व उपनिषदे यांचा अभ्यास केला. त्यामुळे विनोबांच्या विचारांचे संस्कारही त्यांच्यावर झाले. वाईच्या द्रविड हायस्कूलमधून मॅट्रिक झाल्यानंतर त्यांनी सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमध्ये नाव घातले; परंतु महात्मा गांधींच्या असहकार चळवळीकडे ते आकृष्ट झाल्यामुळे त्यांनी शिक्षणाला कायमचा रामराम ठोकला आणि देशसेवेचे प्राथमिक शिक्षण घेण्यासाठी त्यावेळी अंधेरीत निघालेल्या साधक आश्रमात ते आचार्य काका कालेलकर व पुंडलिकजी कातगडे यांसारख्या देशभक्तांच्या हाताखाली काही दिवस राहिले. बा. ज. शिंदे यांच्या-बरोबर मद्यपाननिरोधन, कोर्ट बहिष्कार राष्ट्रीय शिक्षण यांसारख्या चळवळींचा जावळी तालुक्यात त्यांनी प्रचार केला. कोयना धरण योजनेविरुद्ध लोकजागृती केली आणि पुढे त्यांनी सेनापती बापट यांच्या नेतृत्वाखाली मुळशी धरण होऊ नये म्हणून केलेल्या सत्याग्रहात सक्रिय भाग घेतला. १२ ऑगस्ट १९२२ साली खऱ्यांना एक वर्षाची कारा-वासाची शिक्षा झाली. सुरुवातीच्या स्वातंत्र्य सैनि-कांत त्यांची गणना झाली. तुरुंगातून बाहेर पडल्या-नंतर राजकारण हा आपला पिंड नाही हे वेळीच ओळखून ज्ञानकोशकार केतकरांचा 'लवकर नाव मिळवायचे असेल तर स्पर्धारहित क्षेत्रात काम करा,' हा उपदेश शिरोधार्य मानून विविध भाषांच्या अभ्यासाकडे त्यांनी लक्ष केंद्रित केले. सातारमध्ये (१९२४ ते २८) काही वर्षे त्यांनी राष्ट्रीय शाळेत शिक्षक म्हणून काम केले. त्याचवेळी ते सातारा जिल्हा काँग्रेस कमिटीचे काही दिवस चिटणीस होते. १९२८ च्या अखेरीस त्यांनी आपले वास्तव्य पुण्याला









हलविले. प्रारंभी त्यांना फार हालअपेष्टात दिवस कंठावे लागले. भारत इतिहास संशोधक मंडळात त्यांनी १९२९ मध्ये नोकरी धरली. सुरुवातीची काही वर्षे ते मंडळात अल्पशा मोबदल्यात काम करीत होते. तथापि ते आपल्या संशोधनापासून कधीच परावृत्त झाले नाहीत. पुढे त्यांना मंडळातच अभिरक्षकाचे (क्युरेटर) पद देण्यात आले. त्यानंतर त्यांना मंडळाचे कारभारी अथवा चिटणीसपद प्राप्त झाले. कै. दत्तोपंत आपटे, कै. शंकरराव जोशी, कै. आबासाहेब मुजुमदार असे कष्टाळू व कार्यरत कारभारी मंडळाला लाभले. त्यांत कै. तात्यासाहेब खरे यांचा वाटा मोठा व दीर्घकालीन होता. १९७३ साली चिटणीस पदावरून निवृत्त होईपर्यंत ते भारत इतिहास संशोधक मंडळातच राहत असत. त्यानंतर ते कार्याध्यक्ष म्हणून निवडून आले (१९७४) आणि अखेरपर्यंत ते याच पदावर होते. अलीकडच्या काळात ते मंडळाशी इतके एकरूप झाले होते की, भारत इतिहास संशोधक मंडळ म्हणजे ग. ह. खरे असे जणू समीकरणच झाले होते. मंडळात आज सुमारे ७,००० नाणी, २५,००० हस्तलिखित पोथ्या, १०० चित्रे, ८५ रंगीत चित्रकाम केलेली लाकडी पोथ्यांची आवरणे, १,१३८ लघुचित्रे आणि लाखापेक्षा जास्त भरतील एवढी अस्सल ऐतिहासिक कागदपत्रे आहेत. यांतील निम्म्याहून अधिक संग्रह खुद्द तात्यासाहेबांनी स्वतः जमा केलेला आहे.

औपचारिक शिक्षण नसल्यामुळे त्यांनी स्वतःला एक शिस्त लावून घेतली होती आणि ऐतिहासिक कागदपत्रांचे, शिलालेखांचे, ताम्रपटांचे वाचन करता यावे म्हणून कन्नड, उर्दू, फार्सी, हिंदी, संस्कृत वगैरे भाषांचा सखोल अभ्यास केला. त्याचबरोबर हिंदी व इंग्रजीवर त्यांनी प्रभुत्व मिळविले आणि ब्राह्मी, खरोष्ट्री, मोडी, अरबी या लिप्या चांगल्या आत्मसात केल्या. यामुळे ते अत्यंत लीलया प्राचीन व मध्ययुगीन शिलालेखांचे तसेच ताम्रपटांचे वाचन करीत. प्रारंभी त्यांनी भारतविद्येत (इंडॉलॉजी) रस घेतला होता, तरीसुद्धा त्यांच्या व्यासंगाचा आणि आवडीचा विषय मध्ययुगीन इतिहास आणि मराठ्यांचा काल हा होता. त्यामुळे तात्यांनी लिहिलेल्या सुमारे ५६ लहानमोठ्या पुस्तकांत आणि ४०० हून अधिक शोध–निबंधांत प्रामुख्याने मध्ययुगीन इतिहास आणि मराठ्यांचा इतिहास यांविषयीचे संशोधात्मक लेखन विपुल प्रमाणात आढळते. तात्यांनी लिहिलेल्या पुस्तकांत–महाराष्ट्राची चार दैवते (१९५८), मूर्तिविज्ञान (१९३९), संशोधकाचा मित्र (१९५१), दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड– १, २, ३ (१९३०,३४,४९), पंढरपूरचा विठोबा (१९५८) ही चारपाच पुस्तके मान्यवर व अभ्यासपूर्ण तर आहेतच. याशिवाय त्यांनी अनेक घराण्यांचे ऐतिहासिक अस्सल कागद संपादून प्रसिद्ध केले. त्यांपैकी ऐतिहासिक फार्सी साहित्य (चार खंड) व शिवचरित्रवृत्तसंग्रह (दोन) प्रसिद्ध केले. त्यांच्या साक्षेपी चिकित्सक संशोधनाची साक्ष हे ग्रंथ देतात. मूर्तिविज्ञान आणि संशोधकाचा मित्र ही मराठीतील त्यांची विशेष गाजलेली पुस्तके असून मराठीत मूर्तिविज्ञानावर एवढा सूक्ष्म, अभ्यासपूर्ण ग्रंथ अद्यापि कोणीही लिहिलेला नाही. संशोधकाचा मित्र या ग्रंथात तात्यांनी सामान्य संशोधकाला संशोधनासाठी उपयुक्त पडणाऱ्या सर्व उपलब्ध कालगणना आणि बारिकसारिक तपशील दिले आहेत. भारताच्या मध्ययुगीन कालाचा इतिहास लिहिणाऱ्या भारतातील कोणत्याही भाषेतील इतिहासकाराला तात्यांच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने या संदर्भग्रंथाचा आधार घेतल्याशिवाय पुढे जाताच येणार नाही, एवढी त्यामध्ये ऐतिहासिक सामग्री अंतर्भूत आहे. तात्यांच्या पंढरपूरचा विठ्ठल आणि पंढरपूर या ग्रंथातसुद्धा अशीच दुर्मिळ माहिती पाहावयास सापडते. प्रा. खरे हे आपल्या मताबद्दल कधीच दुराग्रही व हट्टी नसत; मात्र मतपरिवर्तनासाठी दुसऱ्या कोणत्याही संशोधकाने जर अस्सल पुरावा त्यांच्यासमोर मांडला तरच ते आपले मत बदलीत. त्यांच्या स्वभावात संशोधकाला आवश्यक असणारा स्पष्टवक्तेपणा आणि निर्भिड वृत्ती तर होतीच, परंतु त्यालाही एक नम्रतेची झालर होती. म्हणूनच चिं. वि. वैद्य किंवा वा. वि. मिराशी वा अन्य मोठ्या संशोधकांच्या लेखनातील चुका दर्शविताना ते कधी बिचकले नाहीत. अजाण लहानमुलापासून विद्वान मंडळींपर्यंत त्यांना इतिहासविषयक कोणतीही शंका विचारली असता ते वय, शिक्षण, विद्वत्ता यांचा विचार न करता अत्यंत तन्मयतेने शंकेचे निरसन करण्याचा प्रयत्न करीत.

अनुक्रमणिका

तात्यांनी कोणत्याही पदाची कधी अभिलाषा बाळगली नाही आणि ते मिळाले नाही म्हणून त्याची तमाही केली नाही.

तात्यांच्या चिकित्सक संशोधनाचे चीज महाराष्ट्रातील अभ्यासूंकडून तसेच विचारवंतांकडून झाले; परंतु शासन वा विद्यापीठे यांनी त्यांची काही प्रमाणात उपेक्षाच केली. पुणे विद्यापीठात ते पदव्युत्तर परीक्षेचे तसेच पीएच. डी. चे अध्यापन —मार्गदर्शन १९५२ पासून अखेरपर्यंत करीत होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक विद्यार्थ्यांनी पीएच. डी. ही पदवीही मिळविली. काही विद्यापीठांतून (मराठवाडा, कोल्हापूर) ते अभ्यागत प्राध्यापक म्हणूनही अलीकडे काम करू लागले होते; तथापि त्यांना डी. लिट्. ही सन्मान्य पदवी मिळण्यास आयुष्याची अखेर गाठावी लागली ( ७ डिसेंबर १९८४).

तात्यांना गेल्या दहा-पंधरा वर्षांत अनेक अॅकॅडमिक मानसन्मान लाभले. त्यांची रेकॉर्ड कमिशनवर सन्माननीय सभासद म्हणून नियुक्ती झाली होती. १९५१ च्या जयपूरच्या अखिल भारतीय इतिहास परिषदेच्या मध्ययुगीन विभागाचे ते अध्यक्ष होते. याच साली कलकत्ता येथील मुद्राशास्त्र अधिवेशनाचे अध्यक्षपद त्यांना देण्यात आले. त्यानंतर वॉल्टेर (आंध्र प्रदेश) येथील अखिल भारतीय इतिहास परिषदेचे ते अध्यक्ष झाले (१९७९). इचलकरंजीचे उद्योगपती पंडितराव कुलकर्णी ह्यांनी स्थापिलेल्या फाय प्रतिष्ठानतर्फे इतिहास संशोधनाच्या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य केल्याबद्दल काही रोख रक्कम देऊन त्यांना फाय पुरस्कार देण्यात आला (१९८२).

मराठी विश्वकोश आणि मा. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. विश्वकोशात ते अभ्यागत संपादक म्हणून १९७२ पासून नियमित येऊ लागले. विश्वकोशातील इतिहासविषयक लेखांत त्यांचा सिंहाचा वाटा आहे. मराठ्यांच्या इतिहासाविषयीचे बहुतेक लेख त्यांनी तपासले असून ऐतिहासिक कालगणना, मराठा राजमंडळ, अनेक संस्थानांवरील नोंदी यांसारखे काही लेख लिहिले आहेत. इतिहासविषयक कोणतीही शंका निर्माण झाल्यास तात्यांकडून तिचे निरसन करून घ्या, असे मा. शास्त्रीजी नेहमी म्हणत असत.

कै. तात्यांचा षष्टयब्दी समारंभ तत्कालीन महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री कै. मा. यशवंतराव चव्हाण यांच्या हस्ते साजरा झाला. त्यावेळी वैयक्तिक रु. ५००·०० ची देणगी तात्यांना देऊन त्यांनी जणु असे बजावले की या पैशाचा विनियोग केवळ तुमच्या कपड्यांवर झाला पाहिजे. तात्यांचा वेष अतिशय साधा असे. लेंगा, शर्ट आणि कोट व कॅन्व्हासचा बूट. त्यांना चांगल्या कपड्याची हौस नव्हती असे नाही. परंतु दुर्दैवाने त्यांना कपड्याकडे लक्ष देण्यास कधी फुरसतच मिळाली नाही आणि पुरेसे पैसेही प्राप्त झाले नाहीत. शेवटची १०–१२ वर्षे सोडली तर तात्यांची एकूण आर्थिक स्थिती तशी जेमतेमच होती. तशात त्यांच्या भावाच्या पाचसहा मंडळींचा सांभाळ त्यांनाच करावा लागला. अखेरच्या दिवसांत त्यांना स्वातंत्र्य सैनिकाचे मानधन आणि पुस्तकांचे थोडेबहुत पैसे मिळाले; तथापि त्यांच्या व्यासंगाच्या आड ही आर्थिक स्थिती कधीच आली नाही. १९४८ मध्ये मॉर्टिमर व्हिलर हे केंद्रसरकारच्या पुरातत्त्वविद्येच्या संचालक पदावरून निवृत्त झाले, त्यावेळी त्यांनी टाइम्स ऑफ इंडियामध्ये आपला पुस्तकाचा जुना संग्रह विकण्याची जाहीरात दिली. ती वाचून तात्या दिल्लीला गेले आणि पैसे जमवून तो संग्रह त्यांनी साडेतीन हजाराला खरेदी केला. हीच भूमिका त्यांची दुर्मिळ ऐतिहासिक साधनांच्या बाबतीत असे. एखाद्या ठिकाणी काही ऐतिहासिक सामग्री आहे, असे समजले की ते त्या व्यक्तीचा वा संस्थेचा पिच्छा पुरवीत आणि ती सामग्री मिळवीत. त्यासाठी त्यांनी ऊन, वारा, पाऊस वा वयाचा कधी विचार केला नाही.

तात्यांनी आत्मचरित्र असे लिहिले नाही, परंतु गेल्या वर्षी एका मासिकातून आपल्या संशोधनासंबंधी एक दोन स्फुट लेख लिहिले. त्यांच्या अमृतमहोत्सवानिमित्त त्यांच्या विद्यार्थ्यांनी भारतातील मान्यवर विद्वानमंडळींच्या सहकार्याने 'स्टडीज इन इंडॉलॉजी अॅन्ड मिडिव्हल हिस्टरी' या शीर्षकाने एक गौरवग्रंथ प्रसिद्ध केला (१९७७). हा ग्रंथसुद्धा तात्यांच्या एकूण इतिहासविषयक व्यासंगाचे एक चालते बोलते प्रतीकच आहे.



अनुक्रमणिका

महाराष्ट्रात कै. वि. का. राजवाडे, रावबहाद्दुर द. ब. पारसनिस, रावबहाद्दुर गो. स. सरदेसाई, कै. वासुदेवशास्त्री खरे, कै. दत्तो वामन पोतदार, कै. त्र्यं. शं. शेजवलकर वगैरे नामवंत – निष्ठावान इतिहास संशोधकांनी थोर आणि उज्ज्वल जी परंपरा निर्माण केली, त्या परंपरेतील तात्या हा अखेरचा दुवा असून महाराष्ट्राचा हा एक चालता बोलता इतिहासविषयक ज्ञानकोश त्यांच्या मृत्यूने खंडित झाला आहे.

गेली आठ-दहा वर्षे तात्या शिवचरित्र लिहिण्यासाठी साधनसामग्रीची जुळवाजुळव करीत होते आणि शिवचरित्र लिहून प्रसिद्ध करण्याची जिद्दही त्यांच्या अंगी होती. त्यांनी शिवचरित्राचा जवळजवळ १६६६ पर्यंतचा भाग लिहून पूर्ण केला होता आणि उर्वरित शिवचरित्राविषयीची त्यांची कच्ची टिपणे तयार आहेत. या साधनसामग्रीचा उपयोग करून तात्यांनी रूपरेषांकित केलेले शिवचरित्र भारत इतिहास संशोधक मंडळाने लवकरात लवकर छापावे, हीच त्यांना वाहिलेली खरी श्रद्धांजली होईल.

⊙ ⊙ ⊙

# भोपाळ दुर्घटनेच्या अनुषंगाने काही विचार

व. त्रिं. चिपळोणकर

### आज जगात प्रदूषण वाढत आहे

भोपाळमध्ये युनियन कार्बाइड या बहुराष्ट्रीय कंपनीच्या कीटकनाशक द्रव्ये बनविणाऱ्या रासायनिक कारखान्यात नुकतीच एक मोठी दुर्घटना घडली. तीमध्ये जवळ जवळ दोन हजार माणसांना मृत्यू आला, अनेक लोक अपंग झाले, तर काही लोक आपली उपजीविका करण्यास यामुळे कायमचे असमर्थ झाले. या घटनेला प्रसिद्धी देण्याकरिता, तिचे स्वरूप सामान्य मनुष्याच्या नजरेला आणून त्याच्या सदसद्विवेक बुद्धीला जागे करण्याच्या उद्दिष्टाने 'नवभारत'चा एक विशेष अंक प्रसिद्ध करण्यात आला. या अनुषंगाने देशातील समाजव्यवस्था, उत्पादनव्यवस्था, मनुष्याची कर्तव्ये, त्याच्या जीवनप्रेरणा अशा अनेक मूलभूत प्रश्नांविषयी अंकातील निरनिराळ्या लेखांत प्रतिपादने करण्यात आली आहेत. उपस्थित केलेल्या सर्व मुद्यांविषयी लिहावयाचे म्हटले, तर त्याकरिता एक ग्रंथच करावा लागेल. त्यांमधील काही विशेष महत्त्वाच्या मुद्यांविषयी प्रस्तुत लेखात विवेचन करण्याचे योजिले आहे.

आजच्या पाश्चात्त्य देशांत व अमेरिकेमध्ये परिसर आरोग्याच्या समारक्षणाचे महत्त्व सर्वांना पटले आहे. या आरोग्याला मानवनिर्मित कारणांमुळे जर कोठे प्रदूषण होत असेल तर त्याचा शोध घेऊन जनतेत प्रचार करून, त्याचे परिमार्जन करण्याचे काम त्या देशांमध्ये अनेक सार्वजनिक संस्था करत असतात. भारतामध्ये सुद्धा अशा प्रकारचे संघटित प्रयत्न करणे आवश्यक दिसते, कारण या देशात औद्योगिकीकरण सारखे वाढत आहे, म्हणून प्रदूषणात भर पडण्याची शक्यता पण वाढत आहे व त्यामुळे या प्रश्नाकडे लक्ष देणे आवश्यक झाले आहे.

### भारतातील प्रदूषणाची उदाहरणे

भारतामधील व परदेशात झालेल्या प्रदूषणाच्या अनेक भयानक घटनांचे तपशीलवार वर्णन अंकात वाचावयास मिळते. यांमध्ये कर्नाटकामधील नद्यांच्या पाण्याचे, तेथील कारखान्यांमुळे कसे मोठ्या प्रमाणात प्रदूषण होत आहे, या वर्णनाचा उल्लेख करावासा वाटतो. दिलेल्या सर्व उदाहरणांत लेखकाने प्रदूषणाचा संबंध कारखान्याशी व विशेषतः त्यात वापरल्या जात असणाऱ्या विषारी रासायनिक द्रव्यांशी लावलेला आहे. औद्योगिकीकरणाने प्रदूषणात भर पडते हे जरी खरे असले, तरी प्रदूषण फक्त औद्योगिक कारखान्यातच होत असते, आपण औद्योगिकीकरण निर्धारपूर्वक स्थगित केले, तर त्यामुळे या जगात प्रदूषणाचे अस्तित्वच असणार नाही, मनुष्याचे जीवन पूर्वीप्रमाणे आबादीआबाद होईल, हा निष्कर्ष मुळीच बरोबर नाही. अर्थात हे सत्य आहे की, औद्योगिक प्रदूषणामुळे विषारी रसायने निर्माण होण्याचा संभव असतो, तर सजीव प्राण्यांमुळे जे प्रदूषण पूर्वी होत असे, त्यामध्ये जीवजंतू व रोगराई निर्माण होत असे. या दोन्ही प्रकारच्या प्रदूषणाचे परिणाम सारखेच भयानक असू शकतात. नमूद करण्याजोगती गोष्ट म्हणजे या प्रकारच्या प्रदूषणावर नियंत्रण करण्याची क्षमता मानवसंशोधित रासायनिक द्रव्यांमुळेच प्राप्त झाली. रासायनिक खते, नवी जंतूनाशक रसायने शोधून काढण्याचे, त्यांचे उत्पादन करण्याचे काम प्रगत पाश्चिमात्य राष्ट्रांकडे व त्यांचे मूल्यमापन, त्यांची गुणदोष विषयक चिकित्सा करण्याचे काम आपल्याकडे अशी कार्याची स्वाभाविक वाटणी झालेली दिसते.

### मनुष्यप्राणीसुद्धा प्रदूषण निर्माण करीत असतो

मनुष्य व इतर प्राणी मोठ्या प्रमाणात प्रदूषण निर्माण करू शकतात, याचा अनुभव घेण्याकरिता लांब जावयास नको. पंढरपूरच्या क्षेत्रस्थानी उद्योगधंदे आजही नाहीत; पण चंद्रभागेच्या वाळवंटात

जर आपण एक सहज फेरी घातली, तर तेथील घाण पाहून, या बाबतीतले मनुष्याचे कर्तृत्व बिलकूल कमी नाही, याबद्दल कोणाचीही खात्री पटेल. कोणत्याही प्रकारच्या कचऱ्यामुळे प्रदूषण होऊ शकते. आजही गावोगाव जाऊन बघितले, तर नदीकाठी घाणेरडी भांडी घासल्यामुळे, कपडे धुतल्यामुळे, रोगी लोकांनी आंघोळी केल्यामुळे नदीचे पाणी सर्वत्र प्रदूषित होत आहे असे आढळेल. प्रातर्विधी करण्याविषयी विधिनिबंध न पाळल्यामुळे बहुतेक सर्व गावांतील विहिरींच्या पाण्याची रासायनिक परीक्षा केली तर गावांतील बहुतेक सर्व विहिरींचे पाणीही दूषित झालेले आहे हे कळेल.

वरील परिस्थितीमुळे देशामध्ये पटकी इ. साथीच्या रोगांचा मोठ्या प्रमाणात प्रादुर्भाव होतो. गेल्या काही वर्षांपूर्वी पुण्यासारख्या मोठ्या शहरात प्लेग, देवी, क्षय, मलेरिया यांसारख्या रोगांची लागण होऊन हजारो मनुष्यांची प्राणहानी होत असे.

पाश्चिमात्य तंत्रविद्येने संशोधन करून नवी व अधिक प्रभावी अशी जंतुनाशक व कीटकनाशक अशी जी द्रव्ये शोधून तयार केली, त्यांचा वापर करून या साथींना आळा घालण्यात आपणास यश आले, ही गोष्ट येथे नमूद करावीशी वाटते.

अनिर्बंधपणे वाढणारी मानवी प्रजा हे सुद्धा प्रदूषणाचे कारण होऊ शकते. लोकसंख्या प्रमाणाबाहेर गेली, तर परिसरातील हवा, पाणी इ. साधनसामग्रीवर ताण पडतो. लोकांमुळे जी घाण निर्माण होत असते, तिचा योग्य निचरा करण्यामध्ये नैसर्गिक शक्ती अपुऱ्या पडतात. रोगसाथींचा प्रादुर्भाव परिसराच्या नैसर्गिक समतोलामध्ये होत असलेल्या बिघाडाचे निर्देशन करीत असतो.

## परिसरावर निसर्ग नियंत्रण कसे करतो

परिसरातील प्राणिसंख्येवर नियंत्रण आणण्याकरिता निसर्ग कठोर उपाययोजना करण्यास देखील मागेपुढे पहात नाही. नॉर्वे, स्वीडन प्रदेशांत हेमींग नावाचे उंदरासारखे प्राणी आढळतात. अनिर्बंध प्रजोत्पादनामुळे या प्राण्यांची संकलित संख्या एका ठराविक मूल्यांच्या पलीकडे गेली की, त्यांना त्यांच्या मन-बुद्धीकडून काय संदेश मिळतो हे केवळ देव जाणे! हजारो हेमींग रांगेने समुद्रात जाऊन आत्मसमर्पण करू लागतात. त्यांची संख्या कमी होऊन एका सीमित मूल्यापर्यंत येते, तेव्हा त्यांना दुसरा संदेश मिळतो! हा संदेश मिळताच ते आपली आत्मसमर्पणाची क्रिया थांबवून परत जमिनीकडे फिरतात.

## वाढत्या लोकसंख्येमुळे होणारे प्रदूषण

मनुष्य हा विचारवंत प्राणी आहे. त्याच्यावर असे कठोर व अतिरेकी उपाय योजण्याची कदाचित पाळी येणार नाही, अशी आपण आशा करू या. पृथ्वीवरील मर्यादित सामग्री-साठ्याची मनुष्यप्राणी अमर्यादपणे उधळमाधळ करीत आहे. उपलब्ध साधन-सामग्री व लोकसंख्या यांमधील समतोल केव्हांच ढळला आहे व तो एका क्रांतिक अवस्थेकडे जात आहे. अवधी थोडा आहे. आपल्या लोकशाही तत्त्वांना, धर्मविषयक आदेशांना, प्रचलित नीतिमूल्यांना लोकसंख्येवर आळा घालण्याकरिता उपलब्ध असलेले कोणते मार्ग सुसंगत आहेत, याविषयी लवकर निर्णय घेऊन ते त्वरेने अमलात आणले नाहीत, तर निसर्ग हस्तक्षेप केल्याशिवाय राहणार नाही. अपघात, युद्ध, दुष्काळ, साथीचे रोग यांसारखे अनेक उपाय निसर्गाजवळ आहेत. आणि हे सर्व उपाय तर्कसंगत निष्ठूरपणे अंमलात आणण्यास निसर्ग कचरणार नाही.

## मनुष्याने निसर्गावर विजय मिळवलेला नाही.

मनुष्याच्या जीवनात निसर्ग व त्याचे नियम हे सर्वश्रेष्ठ आहेत, त्याच्या अधिसत्तेपासून मनुष्याची कोणत्याही परिस्थितीमध्ये सुटका होणार नाही, हे खरे आहे का? यूरोपमध्ये प्रबोधनकाळ होऊन विज्ञानयुग सुरू झाल्याला काही दोन-तीनशे वर्षेच लोटली असतील; पण एवढ्या अवधीत मनुष्याने आपल्या भोवतालच्या परिसर-परिस्थितीमध्ये केवढ्या मोठ्या प्रमाणात बदल घडवून आणण्याची क्षमता मिळविली आहे. प्रतिकूल परिस्थितीपासून जेथे इतर प्राणी फक्त पलायन करतात, तीमध्ये मनुष्य आवश्यक असे बदल आज घडवून आणू शकतो. ऊन, वारा किंवा पाऊस यांपासून आपला बचाव करण्याकरिता मनुष्याने घरे बांधली, वस्त्रे निर्माण केली. वातानुकूलक यंत्रे मनुष्याकरिता त्याच्या परिसर तपमानात इष्ट तो फरक घडवून आणताना दिसतात. शरीर सामर्थ्याच्या दृष्टीने

अनुक्रमणिका

पाहता मनुष्याजवळ फार शक्ती नाही. ऐतिहासिक काळामध्ये कोणत्याही हिंस्र पशूशी गाठ पडताच त्याला आत्मबचावाकरिता पळ काढावा लागत होता. आज यंत्र व विज्ञान यांच्या साहाय्यामुळे निसर्गातील कोणताही प्राणी त्याला आव्हान देऊ शकत नाही. पूर्वीच्या काळी त्याची मलेरिया, क्षय इ. रोगराईपासून स्वसंरक्षण करण्याची क्षमता किती कमी होती ? आज तो विज्ञान व तंत्रविद्या यांचा उपयोग करून अनेक रोगांना यशस्वीपणे तोंड देऊ शकतो. विज्ञान व तंत्रविद्या यांचा उपयोग केल्यामुळे त्याच्या सरासरी जीवनमानाचा आलेख प्रबोधनकाळापासून सतत वर जाताना दिसत आहे. या सर्वांचा अर्थ मनुष्याने " निसर्गावर विजय मिळविला असा होतो का ? " खरी गोष्ट अशी आहे की, मनुष्याने निसर्गातील घटनांचे सखोल निरीक्षण करून त्या कोणत्या नियमांनुसार घडतात, हे प्रथम समजून घेतले. नंतर निसर्गातील शक्तीचे आपल्याला साहाय्य कसे मिळविता येईल, या कार्याकरिता या ज्ञानाचा उपयोग केला. मनुष्याने निसर्गावर विजय मिळविलेला नाही. त्याची शक्ती अमर्याद नाही. याची जर त्याला यथार्थ जाणीव नसेल, तर ती करून देणे आवश्यक दिसते.

## मनुष्याच्या क्षमतेवर मर्यादा आहेत

मनुष्याने आपल्या क्षमतेत खूप मोठी वाढ केली आहे. नैसर्गिक शक्तींचा उगम शोधून काढून त्याने अनेक यंत्रांना आपल्यासाठी कामाला लावले आहे. रोगजंतूंसारख्या नैसर्गिक आपत्तींपासून तो आपले प्रभावीपणे संरक्षण करू शकतो. त्याच्या शरीराचा एखादा भाग जर नादुरुस्त झाला, निकामी झाला, तर शस्त्रक्रिया करून मनुष्य पर्यायी व्यवस्था प्रस्थापित करू शकतो, पण त्याच्या शक्तीला किंवा आकलनाला सुद्धा मर्यादा आहेत. जीवन व मरण यांचे रहस्य त्यास अजून समजलेले नाही. आपल्या मनोबलाने जीवनात मनुष्य खूप काही साध्य करू शकतो; पण त्याच्या आयुष्यातील सर्व मोठ्या घटनांच्या संदर्भात नियती सर्वश्रेष्ठ असते, हे प्रसिद्ध नाटककार हेन्रिक इब्सेन यांचे मत अजूनसुद्धा तितकेच सार्थ आहे, असे म्हणावयाची पाळी येते. 'नियती हि केन वाह्यते.'

भौतिकीदृष्ट्या देखील वरील विधानाला एक विशिष्ट अर्थ देता येतो. कोणत्याही भौतिकीय घटनेमागे असणाऱ्या कारकांची संख्या कमी असेल, तर मनुष्य आपल्या गणितीय विश्लेषणाचा उपयोग करून त्याविषयी अचूक भाकित करू शकतो. म्हणजेच त्याला अशा घटनांवर पूर्ण नियंत्रण मिळाले आहे, असे म्हणता येते. कोणताही एखादा विशिष्ट परिणाम मिळविण्याकरिता नक्की काय केले पाहिजे, याचे अचूक ज्ञान त्यास असते. याउलट काही प्रकारच्या घटनांमागे एकाचवेळी अनेक कारके कार्य करीत असतात. अशा घटनांविषयीचे मनुष्याचे भाकित अचूक नसते. त्यामध्ये फक्त सापेक्ष संभाव्यतेचे दर्शन होते. उदाहरणार्थ, आकाशात उडवलेल्या अवकाशयानाचे मार्गदर्शन मनुष्य अचुकपणे करू शकतो. अमूक एका ठिकाणी जाण्याकरिता यान पृथ्वीवरून कोणत्या दिशेत कोणत्या वेगाने प्रक्षेपित केले पाहिजे, याविषयीचे अचूक ज्ञान तो गणितीय विश्लेषणाद्वारे मिळवू शकतो. उदा., एखाद्या गावातील मनुष्याचे सरासरी आयुष्य किती असेल या विषयी तो अंदाज पण करू शकतो. पण एखाद्या मनुष्याचा मृत्यू केव्हा होईल, याविषयीचे भाकित करणे ही त्याच्या शक्तीच्या बाहेरची अशी गोष्ट असते.

आजचा डॉक्टर रोग्याच्या रोगाविषयी निदान करू शकतो; पण या औषधयोजनेमुळे रोग्याच्या शरीरात नक्की काय कोठे होते, याचे ज्ञान त्याला नेहमी असतेच असे नाही. औषधयोजनेचा परिणाम नक्की काय होईल, याविषयी तो अचूक भाकित बहुधा करू शकत नाही. 'न वैद्याः प्रभुर्युषः' असे एक वचन संस्कृतमध्ये पण आहे.

पाश्चिमात्य संस्कृतीमध्ये विज्ञान व तंत्रविद्या यांवर जेवढा भर दिसतो, तेवढा भर पूर्वीच्या कोणत्याही संस्कृतीमध्ये नव्हता. विज्ञानाचे प्रबोधन होऊन यूरोपियन राष्ट्रांत तंत्रविद्येचा विकास झाला, यंत्रांची निर्मिती झाली, नवीन शस्त्रास्त्रे तयार झाली, शस्त्रास्त्रांमुळे यूरोपियन राष्ट्रांना जगातील अनेक देशांत अधिसत्ता मिळाली, या सर्व गोष्टींमुळे प्रभावित होऊन भारतातील विचारवंतांचे लक्ष विज्ञान व तंत्रविद्येकडे वळले. पाश्चिमात्यांची तंत्रविद्या आम्ही स्वीकारू; पण त्यांचे समाजविषयक तत्त्वज्ञान स्वीकारणार नाही, अशी भूमिका घेणे

आपणास कितपत शक्य आहे ? विज्ञान व तंत्रविद्या यांचा स्वीकार केल्यामुळे मनुष्याच्या संकलित जीवन-विषयक दृष्टिकोनावर काही प्रमाणात प्रभाव पडल्या-शिवाय रहात नाही; पण हा प्रश्न दुय्यम महत्त्वाचा असल्यामुळे त्याचा विचार लेखाच्या पुढील भागात करू या.

### लेखातील निष्कर्ष : असली तंत्रविद्या नको !

लेखामध्ये सर्व परिस्थितीचा साकल्याने विचार करून असा निष्कर्ष काढण्यात आला आहे की, प्रदूषण व अपघात निर्माण करण्याचा स्वभावधर्म असणारी अशी पाश्चिमात्य तंत्रविद्या आम्हास नको, असे म्हणावयाची पाळी आली आहे. हा निष्कर्ष तर्कसंगत नाही, तो अतिरेकी स्वरूपाचा आहे व चालू परिस्थितीमध्ये व्यवहार्य असा पण नाही. हा निष्कर्ष तर्कविसंगत, अतिरेकी व अव्यव-हार्य असा का वाटतो, याचे विवेचन पुढे केले आहे. तंत्रविद्येचा वापर जर अटळ असेल, तर तीपासून होणाऱ्या धोक्याची संभाव्यता कशी कमी करता येईल, याविषयीचा विचार येथे प्रथम केला आहे.

पाश्चिमात्य तंत्रज्ञ म्हणतील की, प्रत्येक तंत्र-विद्येत तीपासून होणाऱ्या संभाव्य धोक्याचा, शक्य उपद्रवाचा विचार करण्यात आलेला असतोच. कारण ही विज्ञान व तंत्रविद्या या क्षेत्रातील सर्व-मान्य पद्धत आहे. अशा धोक्यापासून योग्य संरक्षण देणाऱ्या उपाययोजनेचा उत्पादनप्रणालीमध्ये समा-वेश पण केलेला असतो. या उपाययोजना योग्य तऱ्हेने कार्यान्वित केल्या किंवा हाताळल्या, तर त्यानंतर प्रदूषण किंवा अपघात होण्याचा संभव अगदी कमी राहतो. अजिबात अपघात होणार नाहीत, प्रदूषण होणार नाही अशी शंभर टक्के हमी कोणत्याही भौतिकीय प्रणालीबद्दल देणे अशक्य असते. या दोन दुष्परिणामांची वारंवारता कमीत कमी पातळीवर कशी आणता येईल, एवढाच येथे प्रश्न असतो.

### आपल्याकडे अपघात जास्त का होतात ?

आपल्याकडे प्रदूषण, अपघात हे जास्त अधिक्याने का होतात ? त्याकरिता 'महाराष्ट्र टाइम्स'ने केलेली कारणमीमांसा योग्य व वास्तववादी व सामान्य बुद्धीला पटणारी अशी वाटते. औद्योगिकीकरण आपल्या देशात नुकतेच अधिक प्रमाणात करण्यात येत आहे. आपल्या कामगारांना संयंत्रांचा अनुभव नाही. त्यांची कार्यक्षमता कमी आहे. ते काही प्रमा-णात बेजबाबदारसुद्धा आहेत. आणि या सर्वांत मह-त्त्वाचे, म्हणजे काही तथाकथित कामगार पुढारी आपल्या राजकीय व वैयक्तिक (?) स्वार्थाकरिता त्यांचा बुद्धिभेद करून त्यांना चुकीचे मार्गदर्शन करीत आहेत.

यावर लेखात असे म्हटले आहे की, परदेशातील कामगार कार्यक्षम व जास्त जबाबदार आहेत ना, मग परदेशात पण प्रदूषणाचे व अपघाताचे प्रकार का होतात ? हा तर्कवाद फसवा आहे. एखादा सिद्धांत सार्थ मानला, तर त्याची उलट फिरवून मिळालेली आवृत्ती ही बरोबर असलीच पाहिजे, असा याचा अर्थ होत नाही. म्हणजे कामगार जर कार्यक्षम असतील, त्याचा परिणाम म्हणून प्रदूषण किंवा अपघात होणारच नाहीत, हे म्हणणे बरोबर असत नाही.

आपले कामगार अकार्यक्षम व प्रसंगी बेजबाबदार असतात हे विधान स्वीकारणे आवडणार नाही; पण कोणत्याही गावातील सार्वजनिक क्षेत्रातल्या उद्योगधंद्यांची पाहणी केली असता त्याची प्रचीती मिळू शकते. पाणीपुरवठा करणाऱ्या कालव्यात लोक आंघोळ करतात, धुणी धुतात व तेच पाणी नगर-पालिका सर्वांना पिण्यास पुरवीत असते, असा अनु-भव येत नाही काय ? शहर वाहतूक योजनेमधील बसेस कोणी वेळेवर धुवून साफ ठेवीत नाही. त्या-मधील इंजिनाची बरोबर निगा न ठेवल्यामुळे ते चालताना मोठा आवाज करते. बसच्या बॅटरीची देखभाल बरोबर ठेवली जात नाही. गाडी वेळेवर चटकन सुरू होत नाही. गावातील वीजपुरवठा व टेलिफोन योजना नीटपणे कार्यान्वित होत आहेत, असे किती लोकांचे प्रांजल मत आहे ? पुण्यासारख्या मोठ्या शहरांतून फूटपाथवरून जोरात चालवीत नेणाऱ्या स्कूटर गाड्या व सायकली, रस्त्यावर जागजागी साठलेले कचऱ्याचे ढीग हे काय कार्य-क्षमतेची प्रचीती पुरवित असतात ?

### कामगार वर्गात राजकीय हस्तक्षेप

सामान्यपणे पाहिले, तर राजकीय पुढारी, काम-गारनेते हे आपल्या स्वार्थी हेतूकरिता कामगारांना

चिथवून त्यामध्ये बेशिस्त पसरावयास मदत करतात, असे दृश्य सर्वत्र दिसते. एकेकाळी कामगारनेते कामगाराच्या कल्याणासाठी झटत असत. आज ते कामगार-चळवळीचा आपल्या राजकीय उद्दिष्टां-करिता फक्त उपयोग कसा करून घ्यावयाचा, हे पहात असतात. ब्रिटिशांच्या राजवटीमध्ये अनेक दोष होते; पण येथून प्रयाण करतेवेळी त्यांनी कार्यक्षम, शिस्तबद्ध, व्यवस्थित चालणाऱ्या रेल्वे, राज्य व लष्कर या तीन यंत्रणा स्वतंत्र भारताला दिल्या. स्वस्त लोकप्रियता मिळविण्यासाठी तथा-कथित राजकीय कामगार-पुढाऱ्यांनी वेळोवेळी संप व बंद घडवून आणवून या पहिल्या दोन यंत्रणा खिळखिळ्या करून त्यांना अकार्यक्षम करण्याचेच देशकार्य केले. एका सर्वोदयी पुढाऱ्याने लष्कराच्या यंत्रणेत ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न करून बघितला; पण तो देशाच्या सुदैवाने निष्फळ ठरला.

इ. स. १९७७ मध्ये जेव्हा देशात आणीबाणी होती, तेव्हा अशाच एका कामगार पुढाऱ्याने रेल्वे-मध्ये सुमारे तीनशेच्यावर अपघात घडवून आणून अनेक निरपराध लोकांना दुर्घटनाग्रस्त केले होते. त्याचे एवढ्यावर समाधान झाले नाही. भारताच्या अर्थव्यवस्थेकरिता अत्यंत महत्त्वाच्या, आयात करण्यात आलेल्या मौल्यवान अशा 'हेवी वॉटर' संयंत्रांचा डायनामाइटने नाश करण्यात याच पुढाऱ्याचा हात होता असे म्हणतात. या घातपातामुळे देशातील कामगार वर्गाचे काय कल्याण झाले हे सांगणे अवघड दिसते; पण त्यामुळे स्वतंत्र भारताच्या औद्योगिकीकरणाच्या एका महत्त्वाच्या टप्प्यात अडथळा निर्माण झाला व या देशाच्या हितशत्रूंना समाधान वाटले, हे मात्र नक्की. यावरून असे दिसते की, या तथाकथित पुढाऱ्यांना आपल्या तत्त्व अभि-निवेशाचा इतका कैफ चढत होता की, या प्रयत्नात आपण देशाचे केवढे नुकसान करीत आहोत, याचे भान पण राहत नव्हते.

काही विचारवंतांच्या मते दुसऱ्या महायुद्धापूर्वी समाजवादी युतीचे जे सरकार फ्रान्समध्ये अधि-कारावर होते, त्याने टाकलेल्या काही धोरण-विषयक पावलांमुळे (त्याची तशी इच्छा नसताना सुद्धा) फ्रान्सचा पाडाव करण्याच्या हिटलरच्या कार्याला मदतच झाली असावी.

## पश्चिम बंगालमध्ये काय झाले ?

पश्चिम बंगालमध्ये या तथाकथित कामगार पुढाऱ्यांनी घातपाताची व शिस्तभंगाची कृत्ये करून परकीय भांडवलदाराच्या मार्गात अडचणी उभ्या कर-ण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम एवढाच झाला की, तेथून परकीय व भारतीय भांडवल बाहेर जाऊ लागले. तेथील उत्पादन कमी होत गेले व प्रजेतील बेरोजगारी वाढत गेली. या सर्व घडामोडींमुळे या प्रांताचे केवढ्या मोठ्या प्रमाणात कायमचे आर्थिक नुकसान झाले व होत आहे, याविषयी लंडनच्या 'इकॉनॉमिस्ट' या पत्रात एक मोठा लेख आला आहे. तो सर्वांनी वाचण्यासारखा आहे. भूतकाळात जे बंगाल येथे झाले त्यासारखीच प्रक्रिया महाराष्ट्रात, विशेषतः मुंबई शहरात सुरू झालेली दिसते. ती-बद्दल आपण जर जागरूकता दाखविली नाही, तर त्याचे अनिष्ट परिणाम झाल्यावाचून राहणार नाहीत.

ध्येयवादी लोकांचा एक आवडता असा सिद्धांत असतो की, देशातील संपत्ती मजूर किंवा कामगार वर्ग निर्माण करीत असतो. कोणताही उद्योगधंदा चालण्याकरिता जाणकारी किंवा तंत्रविद्या, भांडवल व कामगार अशा तीन आवश्यक गोष्टी आहेत. भांडवल व यंत्रबळ यांच्या पाठिंब्याशिवाय काम-गाराला संपत्ती निर्माण करण्याची क्षमता येत नाही. सर्व विकसनशील देशांजवळ कामगार व कामगार नेत्यांचा काही तुटवडा नाही. मग ते स्वतःकरिता लागणाऱ्या आवश्यक वस्तू का निर्माण करू शकत नाहीत, हा सवाल का विचारला जात नाही ?

## ब्रह्मदेश व चीन या देशांतील परिस्थिती

ब्रह्मदेश व माऊत्सेतुंग यांचा चीन या दोन देशांनी पाश्चिमात्य तंत्रविद्येकडे बुद्धिपुरःसर पाठ फिरवून स्थानिक तंत्रविद्येच्या साहाय्याने देशाची अर्थव्यवस्था व संरक्षणव्यवस्था चालविण्याचा काही काळपर्यंत प्रयत्न केला. पण त्याचे परिणाम अनिष्ट होत आहेत, हे तेथील राजकीय पुढाऱ्यांच्या लक्षात आले व त्यांनी आपल्या धोरणात फेरबदल केला. यांपैकी एका देशात कम्युनिस्ट सत्ता तर दुसऱ्या देशात लष्करी सत्ता होती. त्यामुळे इतर देशांपासून आपल्या देशाला अलिप्त ठेवून तेथे असले ध्येयवादी प्रयोग करणे शक्य झाले. खरी



अनुक्रमणिका

गोष्ट अशी आहे की, विज्ञान व तंत्रविद्या यांमधील प्रगतीमुळे देशा-देशांतील व्यापारविषयक व वैचारिक दळणवळण वाढते आहे व ते वाढतच जाणार. कोणताही एक देश आजच्या काळात संपूर्णपणे स्वयंपूर्ण नसतो. तो एक बेट पण नसतो.

**लोककल्याण का संपत्तीनिर्मिती ? –**

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात ज्या देशांनी आधुनिक विज्ञान व तंत्रविद्या यांचे, हातचे राखून न ठेवता, स्वागत केले व आपल्या देशातील कामगारनेत्यांवर अंकुश ठेवले, अशा देशांची आर्थिक परिस्थिती सर्व दृष्टींनी आज उत्तम आहे, असे आढळते. जर्मनी, जपान, कोरिया, तैवान, हाँगकाँग व सिंगापूर या देशांतील लोकांच्या राहणीमानात मोठ्या प्रमाणात सुधारणा झाली. जे देश कल्याणकारी राज्याच्या कल्पनेत गुंग होऊन बसले, ते ही प्रगती करू शकले नाहीत. याबद्दल कोणाला पुरावा हवासा वाटेल, तर त्याच्याकरिता खालील आकडे देतो. यावरून हे स्पष्ट होते की, देशातील दरडोई उत्पन्न वाढविण्याकरिता प्रथम देशात संपत्ती निर्माण करावी लागते. या कार्याकरिता कष्ट व शिस्त लागते, निव्वळ घोषणा करून, संप करून चालत नाही.

(संदर्भ : 'न्यूजवीक', १४–१–१९८५)

सापेक्ष प्रतिडोई उत्पन्न

| | १९५० | १९८१ |
|---|---|---|
| अमेरिका. | १०० | १०० |
| जपान | १७ | ७१ |
| जर्मनी | ४० | ८३ |
| इंग्लंड | ५६ | ६३ |

यावरून सामाजिक कल्याणावर ज्यामध्ये सर्वांत जास्त भर होता अशा इंग्लंड या देशात सांपत्तिक निर्मितीचे प्रमाण सर्वांत कमी होते, असे जे आढळते, त्यामागील कारणपरंपरेचा शोध घेणे उद्बोधक ठरावे.

**तंत्रविद्येच्या वापरावरील बंदी तर्कविसंगत व व्यवहार्य का नाही ? –**

कोणत्याही तंत्रविद्येच्या वापरात थोडेफार धोके हे असणारच. पश्चिमी तंत्रविद्येमुळे प्रदूषण होते, अपघात होतात, म्हणून ही तंत्रविद्याच आम्हास नको, हे म्हणणे कितपत सयुक्तिक आहे ? विजेच्या धक्क्यामुळे माणसे मरतात, म्हणून आम्ही वीज-वापरावर बंदी घालणार आहोत काय ?

एका न्यूयॉर्क शहरात दरवर्षी सुमारे २॥ हजार लोकांना कुत्री चावतात व त्यांना इंजेक्शने घ्यावी लागतात. याकरिता आपण कुत्र्यांवर बंदी घालणारा कायदा पसार करणार आहोत काय ?

इंग्लंडमध्ये दरवर्षी बैलांनी हल्ला केल्यामुळे सुमारे ३५०–४०० लोक मरण पावतात. हे थांबविण्याकरिता आपण कायदा करून बैलांच्या वापरावरच बंदी आणणार आहोत काय ?

असा एकांगी विचार करून आपण कायदे करू लागलो, तर ते व्यवहार्य होणार नाही. केलेले कायदे कसे अंमलात आणले जातील, याविषयीसुद्धा विचार करावयाला हवा. कारण कायदे करणे सोपे असते; पण ते अंमलात आणणे अत्यंत कठीण असते. भारत सरकारने लोककल्याणाकरिता दारूबंदीपासून हुंडा-प्रतिबंधक, एकपत्नी कायदा असे अनेक कायदे उत्साहाच्या भरात पसार केले आहेत. हे कायदे आज कसे अंमलात आणले जातात ? –

दुर्दैवाने सरकारी यंत्रणा बहुतांशी अकार्यक्षम व भ्रष्टाचारी आहे. त्यामुळे प्रत्येक नव्या कायद्यामुळे काळाबाजार व भ्रष्टाचार यांसाठी नवीन क्षेत्रे निर्माण झाली, असा सर्वसामान्य मनुष्याचा अनुभव आहे. स्वार्थी भांडवलदार व अकार्यक्षम, भ्रष्टाचारी असा सरकारी नोकर यांपैकी सामान्य मनुष्याचा जास्त मोठा शत्रू कोण आहे, असे जर कोणास विचारले, तर त्याकरिता त्यास थोडा विचार करावा लागेल. कायद्यामुळे न्याय मिळतो, हे फक्त अर्धसत्य आहे. पूर्वीच्या काळी पण अशीच परिस्थिती असावी, कारण बोमार्शे या फ्रेंच लेखकाने म्हटले आहे की, जेथे कायदे संपतात तेथे खरा न्याय सुरू होतो. पण सध्याच्या परिस्थितीमध्ये आपणासमोर कडक कायदे करण्याशिवाय प्रदूषणाविरुद्ध दुसरा मार्ग उपलब्ध नाही, हे मात्र खरे आहे.

**मुक्त अर्थव्यवस्थेमध्ये कायदे कितपत प्रभावी असतात ? –**

या संदर्भात दुसरा एक विचार पुढे येतो तो असा : लोकशाही समाजव्यवस्थेमध्ये अर्थव्यवस्था मूलतः



अनुक्रमणिका

मुक्त असते. तीमध्ये वस्तूच्या किमती, यंत्राचा वापर या गोष्टी आर्थिक व बाजारी प्रेरणेमुळे निश्चित केल्या जात असतात. या ना त्या स्वरूपात यंत्रे पुरातन काळापासून वापरात आलेली आहेत. मानवी जीवनाचा एक अविभाज्य भाग म्हणूनच ती उपस्थित राहत आलेली आहेत. कोणा विचारवंताची प्रथम परवानगी घेऊन मनुष्याने यंत्रे वापरास सुरुवात केली, असे झाले नाही. मग त्याचा त्याग करणे ही गोष्ट एका देशाला कायदेकानू करून करता येणार नाही आणि असा कायदा कोणी केला, तर त्याची अंमलबजावणी करता येणार नाही.

समजा एखाद्या ध्येयवाद्याने उद्या ठरवले की, कापडाच्या सर्व गिरण्या बंद कराव्यात (किंवा ते जे उत्पादन करतील ते सर्व निर्यात करण्यात यावे, असे बंधन त्यांच्यावर घालावे): या देशातील लोकांनी टकळी किंवा चरखा याच्या साहाय्याने जेवढे कापडाचे उत्पादन होईल, तेवढ्याचाच वापर करावा. हा कायदा व्यवहार्य होईल का ?

अथवा समजा, दुसऱ्या एखाद्या कलाकार विचारवंताने ठरविले की, अभिजात संगीत हेच खरे संगीत आहे. फिल्मी संगीत परकीय व भारतीय परंपरेशी विसंगत आहे. म्हणून भारतातील सर्व रेडियो व टी. व्ही. स्थानकांवरून फक्त अभिजात संगीतच सर्वांस ऐकविण्यात यावे. असा निर्बंध व्यवहार्य होईल का ? असा एक प्रयोग भारत सरकारने करून बघितला; पण त्याचा परिणाम एवढाच झाला की, सर्व भारतीय स्थानकांना टाळून श्रीलंका स्थानकाचे कार्यक्रम ऐकण्याकडे लोकांची प्रवृत्ती झाली.

आणि आता समजा, एखाद्या ऑफिसरने असे ठरविले की, मी गुळाचा चहा पितो, सिगारेट ओढीत नाही; म्हणून माझ्या ऑफिसातील सर्व कर्मचाऱ्यांनी फक्त गुळाचा चहा प्यावा व सिगारेट ओढू नये असा नियम केला, तर तो अंमलात येईल का ?

कम्युनिस्ट देशात अर्थव्यवस्था स्वतंत्र नसते; तीवर राजकीय नियंत्रण असते. त्यामुळे अशा प्रकारचे तुघलकी कायदे करणे व अंमलात आणणे तेथे शक्य असते. पण कम्युनिस्ट देशात पारंपरिक स्वरूपाची लोकशाही नसते. लोकांना मतस्वातंत्र्य नसते, तेथे मानवी मूल्ये नसतात. याविषयी काय करावयाचे ?

सत्य परिस्थिती अशी आहे की, सर्व आदर्श मूल्ये व तत्त्वे जीमध्ये आहेत, अशी आपणास हवी असणारी समाजव्यवस्था या जगात कोठेही अस्तित्वात नाही व कधीकाळी पण नव्हती. प्रत्येक समाजव्यवस्थेत काही चांगले गुण असतात, तर काही दोष असतात. त्यामुळे आपणास कोणते दोष सर्वांत कमी हानीकारक वाटतात, हे ठरवून त्याप्रमाणे योग्य अशा समाजव्यवस्थेची निवड आपण करू शकतो. कम्युनिस्ट पद्धतीमध्ये सर्व प्रश्नांकरिता उत्तरे आहेत, हे पण म्हणणे खरे नाही. या पद्धतीमध्ये शेती उत्पादन कसे वाढवावयाचे, त्याकरिता यांतील मूलभूत तत्त्वात बदल करून व्यक्तीकरिता कोणती प्रलोभने ठेवावयाची, हे प्रश्न समोर आहेतच. एवढे मात्र खरे की, आर्थिक व्यवस्थेवर प्रभावी नियंत्रण कम्युनिस्ट समाजव्यवस्थेमध्येच ठेवणे शक्य असते.

## सामाजिक नियंत्रणांमुळे प्रज्ञावंतांवर होणारा अनिष्ट परिणाम

सामाजिक नियंत्रणे वाढवून त्याकरिता विविध जटिल कायदे करून आपण उत्पादनव्यवस्थेवर प्रभाव पाडून तिला योग्य दिशा देऊ शकलो नाही, तरी त्या क्षेत्रातील ज्या लोकांना स्वतंत्र प्रज्ञा आहे, कर्तबगारी आहे अशा लोकांना खूप त्रास देऊ शकतो. कायदे, नियमावल्या करून त्यांच्या कार्यात व्यत्यय आणू शकतो, त्यांच्या कार्यशक्तीचा व वेळेचा अपव्यय करू शकतो. विज्ञान व तंत्रविद्येत किंवा इतर कोणत्याही निर्माणक क्षेत्रात जी प्रगती झाली आहे, तिचे श्रेय लोक-समाजाला नसून, देशातील विधिमंडळांना नसून, तीमध्ये ज्या प्रज्ञावंत व्यक्ती निर्माण झाल्या, त्यांच्याकडे जाते. आज आपण आपल्या घरात विजेचा दिवा, पंखा इ. जी अनेक साधने वापरतो त्यांपैकी बहुतेक प्रयुक्तींचे शोध प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे एडिसन या व्यक्तीने लावले. हे शोध अमेरिकन जनतेने लावलेले नाहीत.

बहुसंख्य सामान्य मनुष्यांच्या हितसंबंधांचे संरक्षण करण्याच्या प्रयत्नात आपण एडिसनसारख्या व्यक्तींच्या प्रेरणांना व कार्याला भरपूर वाव देऊ

शकतो, त्यांना निरुत्साही करीत नाही, याविषयी खात्री करून घेतली पाहिजे. समजा एखाद्या एडिसनने आज एक लहान कारखाना सुरू केला आणि त्याला आढळले की, त्याचा अर्धा वेळ व अर्धी कार्यशक्ती सरकारी नियमावल्या भरण्यात जाते आहे, वीजपुरवठा चालू राहील की नाही हे बघण्यात जात आहे, तर त्याला या सर्वांचा वीट येऊन तो हा प्रयत्नच सोडून देण्याची शक्यता उत्पन्न होईल. हे सर्व सव्यापसव्य करण्यापेक्षा एखाद्या कंपनीमध्ये हिशेबतपासनिसाची नोकरी करणे, हे श्रेयस्कर याबद्दल त्याची खात्री पटेल. ही जर भावना सर्व प्रज्ञावंतांमध्ये पसरली व त्यांनी देशाशी असहकार करावयाचे ठरवले, तर काय होईल ?

ॲन रँड या लेखिकेने आपल्या "व्हेन ॲटलस श्रग्ड" या कादंबरीमध्ये या प्रश्नाकडे लक्ष वेधले आहे. त्यामध्ये एका प्रसंगी देशातील सर्व प्रज्ञावंत व कारखानदार सरकारच्या व सरकारी अधिकाऱ्यांच्या जाचाला कंटाळून जाऊन एकमताने एके दिवशी गुप्त होतात. त्यांनी संशोधून काढलेल्या प्रक्रियांबद्दलची जाणकारी ते आपल्या बरोबर घेऊन जातात. प्रत्यक्ष व्यवहाराचा अनुभव नसलेले उच्च प्रशिक्षित सरकारी संचालक व कामगार या दोघांनाही या कारखान्याचा कारभार सांभाळता येत नाही, असे या पुस्तकात दाखवले आहे. या समस्येमध्ये तथ्य नाही, असे कोण म्हणेल ?

## विद्यमान तंत्रविद्येत दोष आहेत

पाश्चिमात्य वैज्ञानिकांनी विकसित केलेली तंत्रविद्या सदोष आहे, याची जाणीव अनेक विचारवंत पाश्चिमात्यांस झाली आहे. यामधील मुख्य दोष खालीलप्रमाणे : १) ही तंत्रविद्या व यात वापरलेली इंजिने ही भविष्यकाळात लवकर संपुष्टात येणाऱ्या खनिज इंधनावर अवलंबून असतात. २) या तंत्रविद्येची कार्यक्षमता कमी प्रतीची असल्यामुळे तिच्या वापरात साधन-सामग्रीची, इंधनद्रव्याची उधळमाधळ होत असते. ३) या तंत्रविद्येत औद्योगिक शेष-गाळ निर्माण होत असतो, ज्याचा निचरा किंवा नाश करणे निसर्गाला अवघड जाते. या शेष-गाळामुळे व इतर कारणांमुळे नैसर्गिक परिसरात प्रदूषण होत असते. हे दोष जीमध्ये नाहीत. अशी नवी तंत्रविद्या शोधून काढण्याकडे विज्ञानाचे लक्ष वेधले आहे. (बायोगॅसचा वापर करून विद्युत्-उर्जेची निर्मिती, सौर उर्जेद्वारे विद्युत्‌निर्मिती या दोन पद्धती नवीन प्रणालीची सर्वज्ञात अशी उदाहरणे आहेत.)

## आज उपाशी राहून प्रदूषण टाळणार काय ?

अशा पर्यायी तंत्रविद्या विकसित करण्यात तंत्रज्ञांना यश आले, तर मनुष्याच्या समोरील एका मोठ्या समस्येचे निराकरण होणार आहे. त्यांच्या आर्थिक प्रगुणामुळे या प्रणाली सध्याच्या प्रणालीच्या जागा घेतील. त्याकरिता लोकजागृतीचा प्रश्नही उपस्थित होणार नाही. पण परिस्थिती अशी आहे की, अमेरिकेमध्ये या बाबतीत पुष्कळ विकास करण्यात आला असला, तरी त्याचा वापर मोठ्या प्रमाणात अजून करण्यात येत नाही. त्यामुळे आणखी काही वर्षेपर्यंत तरी आपणास परंपरागत तंत्रज्ञानाचाच उपयोग करून घ्यावा लागणार आहे, असे दिसते.

आज आहे या परिस्थितीमध्ये मनुष्याच्या अन्न, वस्त्र व निवारा या मूलभूत गरजा भागविण्याकरिता, क्षय, मलेरिया इ. रोगसाथींपासून बचाव करण्याकरिता, त्याचे आरोग्य टिकविण्याकरिता विज्ञान व तंत्रविद्या यांचे साहाय्य घेतल्याशिवाय गत्यंतर नाही. (लेखामध्ये आपली बाजू मांडण्याच्या अभिनिवेशामध्ये असे सूचित करण्यात आले आहे की, यंत्र, रासायनिक खते, कीटकनाशके, संकरित बी-बियाणे यांचा उपयोग केल्यामुळे भारताच्या शेती-उत्पादनात वाढ झाली हा समज बरोबर नाही. या गोष्टीचा आपण वापर केला नसता, तरी आपले उत्पादन असेच वाढत गेले असते. शिवाय याच्या वापरामुळे आपली पिके "नाजूक व कमजोर" होत गेली आहेत ती तशी झाली नसती). "भोपाळ दुर्घटनेने स्पष्टपणे दाखवून दिले आहे की, प्रदूषणाचा उपद्रव सर्वाधिक प्रमाणात गरीब व दलित समाजघटकांसच होत असतो, म्हणून या नव्या उपायामुळे होणारे प्रदूषण थांबविण्याकरिता आपण या तंत्रविद्येचे उपयोजन ताबडतोब बंद केले पाहिजे, हे लेखकाने केलेले आवाहन स्वीकारणार आहोत काय ? कोणी म्हणेल की, अन्न, निवारा इ. ही मनुष्याची रोजची गरज आहे. प्रदूषणामुळे होणारे परिणाम काही

काळानंतर होऊ लागतात. त्यामुळे दोन दुष्परिणामांचा विचार निराळ्या प्रकारे करण्यात यावा.

सवाल असा आहे की, प्रदूषण होईल म्हणून मनुष्य उपाशी राहणे, फूटपाथवर निवास करणे पसंत करील का? दोन्ही मार्गांच्या शेवटी मरणच असेल, तर उपाशी मरण्यापेक्षा भरल्या पोटाने मेलेले काय वाईट, असाच कोणी सामान्य बुद्धी शाबूत असणारा मनुष्य निर्णय घेईल, असे कोणासही वाटेल! याबद्दलची जाणीव लेखकाला पण दिसते. कारण तेथे असे म्हटले आहे की, सुशिक्षित लोकांनी दीर्घकालपर्यंत केलेल्या अपप्रचारामुळे तो प्रदूषणाच्या बाजूनेच निर्णय देईल. प्रदूषण निर्माण करणारा कोणताही कारखाना बंद करण्यास तेथील कामगार संमती देणार नाही. कारण हा कारखाना त्याच्या उपजीविकेचे साधन असते.

## प्रदूषण-प्रतिबंधक कायदे करताना पाळावयाची पथ्ये

प्रदूषणाची संभाव्यता कमी करण्याकरिता आपण जेव्हा कायदे-निबंध करू बघतो, त्यावेळी हा विचार पण लक्षात ठेवणे आवश्यक असते की, जाणकारी व भांडवल या दोन्ही गोष्टींकरिता आपणास परकीय भांडवलदारांकडे जावयाचे आहे. आपला प्रस्ताव त्यांना आर्थिकदृष्ट्या जर फायदेशीर वाटला, तर ते त्याचा स्वीकार करतील. नाहीतर इतर अनेक अविकसित देश या कार्याकरिता त्यांना उपलब्ध आहेत. देशातील लोकांना रोजगारी देण्याकरिता आपणास जेवढी परकीय भांडवलाची गरज आहे, तेवढी तेथील भांडवलदारांस आपली गरज नाही, हे यामागील सत्य आहे व या सत्याकडे दुर्लक्ष केल्यामुळे अनेक उद्योगधंदे या देशात निघावयाच्याऐवजी इतर देशांत निघाले. सर्व कारखाने सार्वजनिक क्षेत्रामध्ये लोककल्याणासाठी चालविण्याइतके आपणापाशी भांडवल नाही व आर्थिक सामर्थ्य पण नाही. आतापर्यंत उभारलेल्या सार्वजनिक क्षेत्रातील कारखान्यांनी जनतेच्या भांडवलाची जी दशा करून टाकली आहे (त्यामध्ये झालेल्या तोट्याची रक्कम या एकंदर भांडवलापेक्षा जास्त मूल्याची झाली आहे); त्यावरून या बाबतीत ध्येयवादाला व्यवहाराची पण जोड देणे आवश्यक आहे, हे स्पष्ट होते. नाहीतर हा प्रयास फक्त केविलवाणेपणाचे प्रदर्शन करतो. अण्वस्त्रे आहेत महाशक्तीजवळ आणि ज्यांच्याजवळ ती नाहीत त्यांनी कितीही प्रचार केला, तरी त्यांच्या वापरावर इतरेजनांचे काही नियंत्रण राहील ही कल्पना कल्पनासृष्टीतच राहते. त्याप्रमाणे प्रदूषण नको म्हणून आपण उद्योगधंदे बंद करावयाचे व अन्नधान्याकरिता त्याच पश्चिमात्य राष्ट्रांकडे भीक मागावयास जायचे, यासारखी दुर्दैवी घटना कोणतीही असेल, असे मला वाटत नाही. मनुष्याला ध्येयवाद असावाच लागतो. त्याशिवाय जीवनाला अर्थ येत नाही, पण त्याचा अतिरेक झाल्यास त्यापासूनसुद्धा प्रदूषण होऊ शकते. या संदर्भात दोन गोष्टींची आठवण होते. ध्येयवादाचा कैफ हा दारूच्या कैफापेक्षासुद्धा भयंकर असतो, असे सॉमरसेट मॉम यांनी एके ठिकाणी म्हटले आहे. 'आपल्या लाडक्या तत्त्वांकरिता आपल्या साऱ्या देशाचा जो बळी द्यावयास मागेपुढे पाहात नाही; त्याच्यापेक्षा जालीम अत्याचारी कोणीही असू शकत नाही', असे आल्बेर काम्यू यांनी म्हटले आहे.

## पर्यायी तंत्रविद्या आपणास उपलब्ध होईल का?

आज विचार केला तर असे आढळते की, अधिक कार्यक्षमतेने काम करणाऱ्या पर्यायी तंत्र-प्रणालींवरील संशोधन बहुतांशी प्रगत राष्ट्रांतील बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या प्रयोगशाळांतच चालू आहे. त्यांना पर्यायी तंत्रविद्या सापडली, पण त्याची जाणकारी त्यांनी आपणास द्यावयाचे नाकारले, तर आपण काय करणार आहोत? ही शक्यता अगदीच कपोलकल्पित आहे असे म्हणता यावयाचे नाही, प्रगत राष्ट्रांनी अणुऊर्जा तंत्रज्ञानाचा विकास केला; पण हे ज्ञान ते अविकसित देशांना द्यावयास कोठे तयार आहेत? भारताने जेव्हा पोलाद कारखाने उभारावयाचे ठरविले, तेव्हा पाश्चिमात्य राष्ट्रांनी ह्याकरिता मदत करावयास प्रथम नकार दिला होता. रशियाच्या मदतीने भिलाई येथील कारखाना चालू होतो, असे दिसल्यानंतर इंग्लंड व जर्मनी यांनी आपले सहकार्य देऊ केले. अमेरिका या प्रकल्पात भाग घेण्यास आजसुद्धा तयार नाही. याचा अर्थ काय होतो, हे विचारवंतांनी समजून घ्यावे. खनिज

तेल उत्पादन वाढविण्याच्या प्रयत्नांमध्ये भारताचा अनुभव यापेक्षा वेगळा नाही. आता कोणी म्हणेल की, आपण संशोधन व विकास कार्याकरिता इतर देशांवर अवलंबून का राहावे ? या कार्याकरिता लागणारी साहाय्यकारी उपकरणविद्या व प्रशिक्षित तंत्रज्ञ हे निर्माण करण्याकरिता काळ लागतो. म्हणजे या गोष्टींपासून फायदा मिळण्याकरिता बराच काळ जावा लागतो आणि त्याकरिता आपल्याजवळ सवड नाही. विज्ञान व तंत्रविद्या यांचा विकास हे आपले प्राथमिक व सर्वांत महत्त्वाचे उद्दिष्ट, असा आपण निर्णय घेतला आहे का ? देशामध्ये अशा प्रयत्नांना मानवतावादी व ध्येयवादी लोकांकडून सतत उघड किंवा प्रच्छन्न विरोधच होत असतो. ( राज्यक्रांतीनंतर रशियाने असा ठाम निर्णय घेतला व त्याचे परिणाम आज त्या देशात स्पष्टपणे दिसून येत आहेत ). यामागे काही मनोवैज्ञानिक कारणे असावीत, असा काही वेळा संशय येतो.

## भारतीय मानसाची विज्ञानाबद्दलची प्रवृत्ती कशी आहे ?

भारतीय मानसाबद्दल येथे थोडा उल्लेख करणे आवश्यक दिसते. या मुद्द्याचा तसे पाहिले असता प्रस्तुत विषयाशी दूरचाच संबंध आहे. लेखामध्ये याविषयी बरीच चर्चा करण्यात आली आहे. हा प्रश्न महत्त्वाचा असा वाटल्यामुळे त्याविषयीचे विवेचन पुढे केले आहे.

समाजातील प्रत्येक व्यक्तीला दोन उद्दिष्टे असतात. यांपैकी एक वैयक्तिक स्वरूपाचे असते, तर दुसरे सामाजिक स्वरूपाचे. आपल्या व्यक्तिमत्त्वाचा संपूर्ण विकास करण्याकरिता पुरेसे विचार व आचार-स्वातंत्र्य मिळविणे हे व्यक्तीचे पहिले उद्दिष्ट असते. प्रत्येक व्यक्ती कोणत्यातरी समाजाची घटकही असते. या समाजाची व्यवस्था नीट व्हावी, त्याचे संघटन नीट व्हावे यांकरिता प्रत्येक व्यक्तीला काही सामाजिक जबाबदाऱ्या स्वीकाराव्या लागतात; काही निर्बंध मान्य करावे लागतात. विभिन्न स्वरूपांच्या या दोन जबाबदाऱ्यांमध्ये समतोल कोठे व कसा घडवून आणावयाचा, यावर प्रत्येक समाजव्यवस्थेची वैशिष्ट्ये ठरत असतात; तिची गतिशीलता व क्रियाशीलता यांचे प्रमाण पण निश्चित होत असते.

भारतीय समाजव्यवस्थेमध्ये व्यक्तीपेक्षा समाजाला जास्त महत्त्व दिले गेल्यामुळे त्यामध्ये साहस, कर्तृत्व, ऐहिक प्रगती यांसारख्या व्यक्तिगत प्रगुणांना प्रोत्साहन मिळाले नाही. भारतीय मानसावर धार्मिक कल्पनांचा प्रभाव सापेक्षतेने जास्त प्रमाणाचा असल्यामुळे त्याच्या समोर व्यक्तिगत आध्यात्मिक प्रगतीचे एक विशिष्ट ध्येय नेहमी असते. या कल्पनेप्रमाणे संसार असार आहे; मनुष्य हा खरोखरी दुबळा आहे; आपल्यापेक्षा वेगळी व महान अशी ईश्वर नावाची शक्ती आहे आणि तिचा अनुग्रह झाल्याशिवाय व्यक्तीचा उद्धार होऊ शकत नाही, म्हणजे तिला अंतिम शांती व समाधान मिळू शकत नाही. ऐहिक साधनांनी शांती व समाधान मिळू शकत नाही. प्रत्यक्षात आध्यात्मिक मुक्ती मिळविण्याच्या मार्गातील ते अडथळे असतात, हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या मार्गात अहंकार, बुद्धिप्रामाण्यता व विज्ञाननिष्ठता हे अतिरिक्त अडथळे असतात. असा एक चुकीचा समज त्याच्या मनात घर करून बसलेला असतो.

त्यामुळे भारतीय मनुष्य ऐहिक सुखसाधनांविषयी निष्काळजी असतो, तो अल्पसंतुष्ट असतो. त्याच्या जीवनोपयोगी गरजा कमी असल्यामुळे त्या पुरविण्याकरिता थोडे कारखाने पुरे होतात. कमी कारखाने म्हणजे कमी प्रदूषण असे समीकरण मांडता येते. या प्रकारे समाजाच्या जीवनविषयक दृष्टिकोनाचा संबंध प्रदूषणाशी लावता येतो.

अशी परिस्थिती पूर्वीच्या काळी बऱ्याच प्रमाणात होती, असे म्हणता आले तरी ती आज तशी नाही. जगातील देशादेशांमधील दळणवळणाच्या साधनांत सारखी सुधारणा होत आहे. त्यामुळे कोणत्याही एका देशाला आपणास इतरांपासून अलिप्त ठेवून, एकदम निराळ्या तऱ्हेचा आकृतिबंध स्वीकारणे शक्य राहिलेले नाही. विज्ञान व तंत्रविद्या यांचे साहाय्य घेऊन जगातील इतर राष्ट्रे आपल्या देशातील लोकांचे राहणीमान वाढवीत असतील, तर आपल्या देशात प्रदूषण होते म्हणून तो मार्ग नको; असे म्हणण्याजोगी जगाची परिस्थिती राहिलेली नाही.

शेजारची राष्ट्रे आपल्या शस्त्रसंभारात वाढ करीत असताना आपण आपल्या संरक्षणक्षमतेत

वाढ करण्यास नैतिक तत्त्वाकरिता नकार दिला, तर तो शुद्ध वेडेपणा गणला जाईल. तत्त्वनिष्ठा केव्हाही चांगली; पण त्याकरिता सत्यसृष्टीचा विसर पडून देऊन मनुष्य स्वप्नसृष्टीत जाऊ लागला, तर ती प्रदूषणाइतकीच भयानक बाब होऊ शकते. नेपोलियनचे एक वचन आहे की, भव्य-दिव्य व हास्यास्पद यांच्यामध्ये फक्त एक लहान अशीच पायरी असते. भारताच्या एका भूतपूर्व राष्ट्रपतींनी देशाने सैन्य ठेवण्याचीच गरज नाही, असे एक प्रतिपादन एका प्रकट संमेलनात केल्याची आठवण या संदर्भात होते. अशा देशामध्ये शिवाजी महाराजांसारखा विवेकी प्रज्ञावंत जन्मास यावा, याबद्दल परत परत आश्चर्य वाटते.

### या विवेचनाचा निष्कर्ष असा आहे :

प्रस्तुत लेखात अनेक मुद्द्यांचा विविध दृष्टीकोनांतून विचार करण्यात आला आहे. त्याकरिता थोडा फार विषयविस्तार करावा लागला आणि तो करणे पण अपरिहार्य होते. प्रश्नाचे महत्त्वच तसे होते.

प्रदूषण होणार असेल, तर आपण पाश्चिमात्य तंत्रविद्या वापरण्यास नकार दिला पाहिजे; या मूळ लेखातील प्रतिपादनाबद्दल शेवटी निष्कर्ष काय निघतो, असा प्रश्न काही लोकांना विचारावासा वाटेल. त्याकरिता उत्तर असे आहे :

१) जगात आढळणारे प्रदूषण औद्योगिकीकरणामुळेच होत असते, हे खरे नाही. पूर्वी प्रदूषण नव्हते, असे म्हणणेसुद्धा बरोबर नाही.

मनुष्यामुळे प्रदूषण होत असते. वाढत्या लोकसंख्येमुळे होणाऱ्या प्रदूषणाचा धोका सर्वांत अधिक आहे.

२) मनुष्याकरिता अन्न, निवारा इ. गोष्टींची निर्मिती करण्याकरिता औद्योगिकीकरणाशिवाय आज अन्य पर्याय नाही.

अशा औद्योगिकीकरणामुळे जर प्रदूषण होत असेल, तर ते अपरिहार्य आहे, अटळ आहे.

त्याचे प्रमाण कसे कमी करता येईल, एवढाच प्रश्न मागे राहतो.

३) कायदे करून प्रदूषण कमी करण्याचा प्रयत्न करता येईल; पण या संदर्भात आपला प्रतिसाद अतिरेकी स्वरूपाचा होत नाही, ही काळजी घेणे आवश्यक. त्याकरिता काही पथ्ये पाळणे आवश्यक ठरते. कारण आपण परकीय जाणकारी व भांडवल यांवर अवलंबून आहोत.

४) लोकशाहीमध्ये अर्थव्यवस्था मुक्त असते. कायदे करून निबंध घालणे सोपे असते; पण ते अंमलात कसे आणावयाचे हा महत्त्वाचा प्रश्न असतो. समाजात धर्माचे अवमूल्यन होत आहे. नीतिमूल्ये शिथिल होत आहेत. चलनवाढ आहे. कम्युनिस्ट देशांप्रमाणे सामाजिक बांधिलकी नाही. या सर्व कारणांमुळे भ्रष्टाचार सर्व स्तरांवर सारखा वाढत आहे. कायद्यामुळे सरकारी नोकरांच्या भ्रष्टाचाराला फक्त नव्या दिशा मिळतात. काही दिवसांनी लोकांचा न्यायव्यवस्थेवरील विश्वासच संपुष्टात येईल.

५) जगातील दळणवळणाची साधने वाढल्यामुळे कोणताही एक देश इतर देशांपासून संपूर्णपणे वेगळा असा होऊ शकत नाही.

त्यामुळे अर्थव्यवस्थेवर निबंध घालून काही गोष्टींवर बंदी आणणे म्हणजे कालप्रवाहाच्या गतीच्या उलट दिशेने जाण्यासारखे निष्फळ आहे.

६) प्रदूषण कमी करण्याकरिता मनुष्याने आपल्या गरजा कमी कराव्या. आयुबचावाच्या (सर्व्हाव्हल) दृष्टीने सुद्धा हा मार्ग श्रेयस्कर होणार आहे. दुसरा मार्ग म्हणजे लोकसंख्येवर कडक आळा घालणे हा होय.

### भारतीय व पाश्चिमात्य संस्कृती यांची तुलना

मूळ लेखामध्ये मूळ विषयाशी विशेष संबंध नसणारे असे काही विचार सापडतात. त्यांविषयी उल्लेख केल्यावाचून राहवत नाही.

लेखामध्ये अनेक ठिकाणी असे सूचित करण्यात आले आहे की, पाश्चिमात्य संस्कृतीमधील लोक फक्त ऐहिक सुखाचा विचार करतात, ते स्वार्थी आहेत. त्यांना समाजकल्याणाची चाड नसते. इतिहासकालाच्या एका कालखंडात हे विधान सार्थ वाटावे, अशा घटना घडल्याही असतील; पण त्यानंतर लोककल्याणाच्या अनेक योजना व विचार या संस्कृतीनेच जगाला दिले, हे विसरता येत नाही. विज्ञान व तंत्रविद्या यांची गोष्ट बाजूला ठेवली, तरी साहित्य, काव्य, तत्त्वज्ञान, इतिहास, संगीत असे कोणतेही वैचारिक क्षेत्र नाही की, ज्यामध्ये यूरोपियन संस्कृतीचा सहभाग महत्त्वाचा नाही.






तसा विचार केला असता, मानवजात सरासरीने सर्वत्र सारखीच आहे. त्यामधील प्रेरणा, प्रवृत्ती, स्वभावविशेष यांमध्ये थोडेफार फरक असतील ; पण या फरकांपेक्षा साम्यस्थळेच अधिक सापडतील.

दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी व्यापाऱ्यांनी नफा मिळविण्याकरिता बंगालमध्ये कृत्रिम दुष्काळ घडवून आणला. यामध्ये दहा लाख माणसे भूकेने मेली, असा अंदाज करण्यात आला आहे. पाश्चिमात्य लोकांवर स्वार्थी हा शिक्का मारावयाच्या आधी, मला वाटते, वरील गोष्टींचे प्रथम स्मरण करावे.

भारतीय संस्कृती उच्च आहे, कारण इतर संस्कृतींमध्ये फक्त ऐहिक सुखप्राप्तीवरच भर दिला जातो. हा "न्यूनगंड" जर आपण सोडला, तर आपणास आपल्या देशातील लोकांचे कल्याण करण्याचे अनेक मार्ग दिसू लागतील.

अनातोल फ्रान्स या फ्रेंच लेखकाचे खाली उद्धृत केलेले विचार मला या संदर्भात अर्थपूर्ण वाटतात. ते म्हणतात, "स्वत:विषयी व एकंदर मनुष्यजातीविषयी अतिरंजित उच्च कल्पना बाळगल्यामुळे माणसे दुसऱ्यास व आपणास दु:खी बनवीत असतात, असे मला वाटते. मनुष्यस्वभावाविषयी तो जास्त वास्तववादी व जास्त लीनतापूर्ण अशी कल्पना करू शकला, तर तो इतरांप्रती व आपणांप्रती जास्त सहृदयता दाखवू शकेल."

## भोपाळ घटनेचे राजकीय पडसाद

भोपाळ घटनेच्या संदर्भात मूळ लेखामध्ये अस्वस्थ करणारे असे काही उल्लेख सापडतात. उदा.; पान सातवर पुढील उल्लेख आढळतात. "लोकशाही राजकारणाच्या रूढ रीतीनुसार सत्तेवर असलेल्या प्रतिस्पर्धी पक्षांच्या हातून सत्ता हिसकावून घेण्याच्या उद्देशाने, घडणाऱ्या प्रत्येक दुर्घटनेस सत्तारूढ पक्षास जबाबदार धरणे, त्या पक्षाविरुद्ध हेवा निर्माण करणे ही गोष्ट शिष्टमान्य आहे."

(कोणत्याही) "दुर्घटनेचा आधार घेऊन प्रस्थापित व्यवस्थेशी राजकीय संघर्ष काही व्यक्ती किंवा काही संघटना करत असतील, तर त्यात अनुचित असे काहीच नाही."

हे वाचल्यानंतर कोणाच्याही मनात शंका येते की, मूळ लेखात दाखविलेला नैतिक आवेश या राजकीय हेतूनेच आणला होता का ? असा विकल्प निर्माण होणे दुर्दैवी समजावे लागते. कारण सर्वच विवेचनाला मग प्रचाराचा वास येऊ लागतो.

स्वत:जवळ पर्यायी कार्यक्रम नसताना, देशासमोर असलेल्या प्रश्नांकरिता जवळ उत्तरे नसताना जर सत्ताधारी पक्षाच्या हातून सत्ता काढून घेण्याचा कोणी प्रयत्न केला, तर त्यामध्ये फक्त स्वार्थ व अहंकार यांचेच दर्शन घडणार !

एकीकडे पाश्चिमात्य संस्कृतीला त्याज्य ठरवून भारतीय संस्कृतीची महती गावयाची व दुसरीकडे सत्ता संपादनाकरिता भारतीय संस्कृतीशी विसंगत अशा संघर्ष व कलह यांवर आधारित असलेल्या पद्धतीचा उपयोग करून बघावयाचा, यांमधील विसंगती खटकल्यावाचून राहात नाही. सत्ता हे लोकांचे कल्याण करण्याचे एक साधन असते, अशा प्रयत्नांत ते साध्य बनल्याची प्रचीती मिळते.

बर्ट्रंड रसेल यांनी आपल्या एका पुस्तकात म्हटले आहे की, 'मनुष्याचे मूल्यमापन करण्याकरिता तो काय तत्त्वज्ञान सांगतो याकडे बघू नका. तो आपल्या आयुष्यात प्रत्यक्ष काय करतो, याकडे पहा.' भारतामध्ये लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी मूल्ये इ. शब्द गुळगुळीत नाण्याप्रमाणे सर्वत्र पुढे सरकवले जातात. मुंबई शहरातील शेकडा तीस टक्के लोक झोपडपट्टीत, फूटपाथवर राहतात. त्यांना आपले भविष्य बनविण्याची संधी मिळत नाही, न्याय मिळत नाही. अशा परिस्थितीमध्ये लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य, प्रदूषण हे फक्त नुसते शब्द बनतात. त्यांना आयुष्यात काही संदर्भ राहात नाही, असे मला वाटते.






# श्रृंगापत्तीत सापडलेला आयुर्वेद*

## ( धन्वन्तरीला पुतण्याचे पत्र )

**मधुकर जोशी,**
२० एप्रिल ८५, यु. एस्. ए.

ती. अण्णांना कृ. सा. न. वि. वि.

डिसेंबर ८३ मध्ये हिंदुस्थानात आलो होतो. त्या वेळेस तुम्ही मला तुमचे आयुर्वेदावरचे अनेक लेख वाचायला दिले. तुम्ही म्हणालात, " वाच, अभिप्राय कळव आणि अमेरिकेत काही लेख प्रकाशित कर ". मी बळजबरीमुळे ' हो ' म्हणालो. आता १५ महिन्यांनंतर, ' वाचेन व अभिप्राय कळवेन' या मानसाची पूर्ती करत आहे. तुमचा घर्षणावरचा लेख ' इंटरनॅशनल जर्नल ऑफ होलिस्टिक हेल्थ अँड मेडिसिन' नावाच्या त्रैमासिकाकडे पाठवत आहे. त्या त्रैमासिकाची माहिती कळायला वेळ लागला.

वैद्यक माझा विषय नाही. मला इंजिनिअरिंग-खेरीज इतर वाचायला व लिहायला वेळ आणि ताकद उरत नाही. पाश्चात्त्य शिक्षणाचे चेटूकही बाधले असल्याने तुमच्या लेखांची परीक्षा तुमचा विरस होणार नाही अशा पद्धतीने करणे मला कठीणच आहे. गेली ५५ वर्षे माझे लालनपालन तुम्ही केले आहे. पण २७ वर्षे तुमच्यापासून मी दूर राहिल्यामुळे मी तुम्हाला पूर्वी जितका आवडायचा, तितका आवडत नाही. तुमचे प्रेम वाढावे यासाठी मी स्वतःला वैद्यकाच्या किचकट चरकात घालून तुमच्या आयुर्वेदीय लेखांवरचा अभिप्राय निर्माण केला. मला फार भीती पडली आहे की, हा रस नाही; काढा आहे.

अण्णा, तुम्ही भारतातले नामवंत वैद्य. असंख्य डॉक्टरांच्या जगतात वैद्य हळूहळू अल्पसंख्यांक होत आहेत. तुम्ही आयुर्वेदाच्या जतनासाठी जन्मभर खपला आहात. आयुर्वेद मरतो आहे, याची दारुण जाणीव तुम्हाला झाली आहे. तुम्ही त्यामुळे दुःखी आहात. शिवाय तुम्ही ९२ वर्षांचे वृद्ध म्हणून जर्जर. नातेवाईकांनाही आयुर्वेदाविषयी आदर नाही म्हणून चिडखोर होत चालला आहात. " माझी औषधे बरे नसले म्हणजे खातात; बरे होतात तेव्हा गप्प बसतात. बरे न झाल्यास स्वतःच्या गैर पथ्यपाण्याचा विचार न करता आयुर्वेदावर टीका करतात ", असे तुम्हाला नेहमी वाटते. आयुर्वेदावर टीका झाली, की तुम्हाला तुमच्या व्यक्तिमत्त्वावरच टीका केल्यासारखे वाटते. मला तुमच्या वैद्यकीय कौशल्याविषयी कायम आदर आहे. माझ्या तिशीपर्यंतच्या भारतीय जीवनात डॉक्टरची भेट अपवादात्मक होती. तुम्हीच माझे आरोग्य-संचालक होता. आयुर्वेदीय वैद्यकच मला वैद्यक होते. तुम्हीच मला वैद्यकाचे ज्ञान देणारे ' ब्रह्मा ' होता. मी केवळ तुमचा ' दक्ष ' होतो. माझे संस्कृत विसरले व आयुर्वेदातही मी आता दगडू झालो आहे. आता हे पत्र लिहिताना गर्भगळित झालो आहे.

अमेरिकेत आल्यापासून मी आयुर्वेदविहित दिनचर्या टाकली. तुम्ही मला गेल्या भेटीत म्हणाला, " माझे रक्तदाबावरचे औषध घे. " मी नाही म्हणालो, कारण वैद्य व रोगी यांचे रोग बरा होईस्तोवर साहचर्य असलेच पाहिजे, अशी माझी समजूत. तुमचा अपमान झाला. तुम्हाला लक्षात

---

* प्रख्यात आयुर्वेदाचार्य श्री. वेणीमाधवशास्त्री जोशी, मुंबई यांना, त्यांचे पुतणे ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ह्यांचे ज्येष्ठ चिरंजीव ) डॉ. मधुकर जोशी ( व्हरमाँट, अमेरिका ) ह्यांनी पाठविलेले हे खाजगी पत्र. तथापि ह्या पत्रात आयुर्वेदाबाबत काही मूलभूत प्रश्न उपस्थित केलेले असल्यामुळे आम्ही ते ' नवभारता'त प्रसिद्ध करीत आहोत. – संपादक.



अनुक्रमणिका






यायला पाहिजे, की मी देशकालबद्ध आहे. मी तुम्हाला टाकले हे खरे नाही. "आयुर्वेदीय कार्याची म्हणजे माझ्या आयुष्याच्या सबंध कामगिरीची तुला परवा नसेल तर तुझी हुडुत् !" या तुमच्या चिडीचा मला अर्थ कळतो. पण अण्णा, तुम्हीही अनेक ठिकाणी व अनेक वेळा म्हणाला आहात, "आयुर्वेद नष्ट होणार आहे आणि त्याला कोणी वाचवील असे आता दिसत नाही." प्रलयकाळच्या लोंढ्याविरुद्ध पोहणारे तुम्ही वीर आहात. मी आहे पोटभरू इंजिनिअर. सर्व्हांटिसच्या 'डॉन किहोते' या कादंबरीतला नायक एक जुन्या जगातला सरदार आहे. त्याची मूल्ये उच्च होती. त्याने खूप वाचनही केले होते. स्त्रियांचा मान, सत्य, शौर्य इत्यादी गोष्टींसाठी प्राणार्पण करायला तो तयार असे. आयुष्याच्या शेवटी त्याच्या लक्षात येते की, जग झूट आहे. सांचो नावाचा त्याचा एक शेतकरी सेवक होता. त्याला पुस्तके झूट होती; पण लबाड जग त्याला कळे. अण्णा, मला काही वेळा वाटते, तुम्ही 'डॉन किहोते' आहात व मी तुमचा 'सांचो' आहे. आयुर्वेदासाठी मला टाकू नका. मला सगळ्या थिअरीज व तत्त्वज्ञाने मजेने समजाऊन घ्यायचे खेळ वाटतात. हे खेळ बदलत असतात. खेळातले प्रतिस्पर्धी थकले वा मेले म्हणजे अनेक वेळा घनचक्कर वादविवाद मरतात. आगरकर व टिळक यांच्यातले वाद आता किती क्षुद्र वाटतात! आइनस्टाइन मेल्यानंतर 'क्वांटम् फिजिक्स'शी भांडणारा कोणीही नाही.

'क्वांटम् फिजिक्स'मध्ये पूरक तत्त्व मान्य आहे. अभिजात फिजिक्समध्ये इलेक्ट्रॉन हा कण तरी, नाहीतर लाट तरी. क्वांटम् फिजिक्समध्ये इलेक्ट्रॉन हा कण व लाट एकदम असतात, हे विधान न्यान-वाला वा तर्कतीर्थाला उघडउघड विरोधात्मक म्हणून मौर्ख्यपूर्ण आहे; पण क्वांटम् तर्कशास्त्रात अगदी समंजस आहे. क्वांटम् फिजिक्स प्रायोगिक सत्याला प्रथम श्रेणीचे महत्त्व देते. आयुर्वेद हेही प्रायोगिक शास्त्र आहे वा असायला हवे. माझ्या मते आयुर्वेद व ॲलोपॅथी हे कण की लाट इतके विरोधी मात्र निश्चित नाहीत.

डॉक्टर हवा की वैद्य हवा, ही निवड विष हवे की औषध हवे, इतकी सहजसोपी मानणे अनुचित आहे. तुम्हाला कॉलरा झाल्यास तुमची कायम सेवा करणाऱ्या माई तुम्हाला सलाइन असणाऱ्या वैद्याकडे म्हणजे डॉक्टरकडेच नेणार व तुम्ही कांकू करत ते हो म्हणणार. अल्सर असल्यास वैद्याकडे जायला त्या तुम्हाला होच म्हणणार. माई सांचोसारख्या स्वार्थ-पूर्ण डोळस आहेत. मी आयुर्वेदाची थिअरी तुमच्या लेखांच्या अनुसाराने न्याहाळायला लागलो. ती सोपी आहे. पुस्तके लहान आहेत व थोडी आहेत. ॲलोपॅथीत जाडे-जाडे ग्रंथ व ते शेकडो आहेत. ते सारखे बदलत आहेत. नवीन ग्रंथ सारखे निर्माण होत आहेत. ॲलोपॅथीतली थिअरी एक नाही; प्रत्येक रोगाची थिअरी वेगळी व थिअरी बदलते. आयुर्वेदीय थिअरी सोपी व स्थिर. ॲलोपॅथिक थिअरी बहुविध, किच-कट व अस्थिर. माझ्या लक्षात आले की, ॲलोपॅथी-तल्या थिअऱ्यांना समंजसपणा नाही! मग केला मी थिअरी कशी असावी या थिअरीचा अभ्यास; म्हणजेच थिअरींच्या थिअरीचा अभ्यास. मग माझे मत बदलले. मी थिअरींच्या थिअरीचे विवेचन या पत्राच्या शेवटी करणार आहे.

अलीकडे ८५ वर्षे सोडली तर, म्हणजे मुंबई आदी अवाढव्य शहरांची वाढ सुरू होण्यापूर्वी, डॉक्टर सामान्यांना फारसा माहिती नव्हता. वेद-कालापासून हजारो वर्षे आयुर्वेदीय वैद्यकच गरिबां-पासून श्रीमंतांपर्यंत सर्वांच्या तब्बेतीची काळजी करे. भारतात अनेक भौतिकशास्त्रे जन्मली नाहीत; जन्मली तरी वाढली नाहीत. पण वैद्यकशास्त्र व देवळांचे स्थापत्यशास्त्र ही आपली अमोल स्थिर लेणी आहेत. शास्त्रे– त्यातल्यात्यात भौतिकशास्त्रे– वाढायला विशिष्ट वातावरण लागते. त्या वातावर-णाचे वर्णन मी येथे करत नाही. पण गुलामसंस्था वा चातुर्वर्ण्य माणसांची, हाताने काम करणारे कम-दर्जाचे व बुद्धीने काम करणारे उच्च दर्जाचे, अशी वर्गवारी करते. त्यामुळे न्हावी सर्जन होतो व पोथी-वाला ब्राह्मण वैद्य होतो. अहिंसावादामुळे आयुर्वे-दीय सर्जरी मागासली, हे तुमचे म्हणणे कळणे कठीण आहे. जुन्या ग्रीसमध्ये व भारतामध्ये भौतिकशास्त्रे वाढली नाहीत, या घटनेच्या अर्थासाठी सामान्य कारण मला उच्चनीच कर्मविभाग हे वाटते. ग्रीस-मध्ये २५०० वर्षांपूर्वी गुलामसंस्थेशी तद्रूप तेथले तत्त्वज्ञानी होते. ते तंत्रविद्या व भौतिकविद्या अव-





मानत. गणित ते फार उच्च मानत. १+१=२ हे गणितात बरोबर असले, तरी फिजिक्समध्ये नसते. उदाहरणार्थ, १ गॅलन पाणी + १ गॅलन दारू म्हणजे २ गॅलन मिश्रण नसते. थोडे कमी असते. फिजिक्स ग्रीकांच्या गणितासारखे नाही. ग्रीकांचे गणित म्हणजे यूक्लिडची भूमिती. पाच मौलिक गृहीतांतून सबंध भूमिती जन्माला आली. सिद्धता कशी करावी, याचे आदर्श त्यांनी मांडले. पण आधुनिक फिजिक्स बॅबिलिअनांच्या गणितासारखे आहे. त्यांच्या गणितांतील सत्ये विस्कळित गोधडीसारखी एकत्र जोडलेली असत. प्लेटो, ॲरिस्टॉटल यांना भोवताली फिजिसिस्ट असतानाही त्याचे महत्त्व कळले नाही. ॲरिस्टॉटलचे फिजिक्स हास्यास्पद आहे. प्रायोगिक ज्ञानाविषयी प्लेटो आदी शुद्ध वाचस्पतींना होकायंत्रे, पाणयंत्रे, घड्याळे भोवताली असतानाही चांगले प्रश्न कसे विचारायचे समजले नाही. आर्किमिडीज हा गृहीते कशी करावीत, प्रयोग कसे करावेत व थिअरी कशी मांडावी यात पटाईत होता. आधुनिक शास्त्रीय पद्धतीचा तो संस्थापक होता. पण त्याच्या थिअरीज बॅबिलिअनांच्या गणितासारख्या गोधड्या होत्या; ग्रीकांच्या गणितासारखे गालिचे नव्हते. अण्णा, मी तुम्हाला सांगतो, अगदी शपथपूर्वक सांगतो, आधुनिक शास्त्रे म्हणजे आदर्श संपूर्ण सिद्ध-शास्त्रे, असे नसते. त्या शास्त्रांमध्ये सारखी डागडुजी चालू असते.

चांगली घड्याळे, पाणयंत्रे, दुर्बिणी, सूक्ष्मदर्शनी इत्यादी तंत्र-वस्तूंच्या जन्माला वा विकासाला १८०० वर्षे उशीर झाला. कारण गणित व तत्त्वज्ञान म्हणजे विद्या व इतर विद्या म्हणजे जणू दगड्या विद्या हा तत्त्वज्ञान्यांचा आकस होता. प्रबोधनाचे युग प्लेटो आदी विद्वानांनंतर २,००० वर्षे पुढे उशिरा जन्माला येते, यात मला आश्चर्य नाही. भारतातही ब्रह्मविद्या म्हणजे विद्या व इतर अविद्या हे ग्रीक जगताशी समांतर घडते. अलेक्झांडर द ग्रेट याच्या भेटीने मोठा फरक भारतीय विद्यांमध्ये घडला नाही याचाही अर्थ मग समजतो. यंत्रयुग भारतात ब्रिटिशांनंतर आले; ब्रह्मविद्येची पकड सैल झाली; आणि झटपट फिजिक्समधला रमण जन्मला. फिजिक्स, रसायनशास्त्र आदी अवलोकनांतून जन्माला येणारी शास्त्रे, यंत्र व तंत्र यांच्या प्रगतीतूनच वाढतात. नुसत्या कल्पनावैभवातून वा त्याच्यातील क्रांतिकारक आकस्मिक तुफानातून फिजिक्स व रसायनशास्त्र यांचा जन्म झालेला नाही. दुर्बिणीशिवाय गॅलिलिओ अस्तित्वात येऊ शकत नाही. मायक्रोस्कोपशिवाय पाश्चर नाही. स्टेथोस्कोपशिवाय वैद्य नाही, डॉक्टर नाही. यंत्र, तंत्र वाढलेल्या भौतिकशास्त्रांची, किंबहुना सर्व विद्यांची, एकत्र सामुदायिक वाढ कोठल्याही विशिष्ट शास्त्राच्या वाढीला आवश्यक असते. विद्यांचे परस्परावलंबित्व अविवाद्य आहे.

म्हणूनच अण्णा, तुमच्या ॲलोपॅथीविरुद्धच्या काही तक्रारी चुकीच्या आहेत. त्यातल्या मुख्य दोन तक्रारी :

१) "सर्जरी हे स्वतंत्र शास्त्र असून ॲलोपॅथीचे अंग म्हणून विकसित झालेले नाही."

२) "रुधिराभिसरणाच्या शोधापासून क्ष किरणांच्या शोधापर्यंत ...... हे सगळे शोध ॲलोपॅथीने लावलेले नाहीत. ॲलोपॅथीच्या शास्त्राशी त्या शोधांचा साक्षात असा काहीही संबंध नाही. हे भौतिकशास्त्रात स्वतंत्रपणे लागलेले शोध आहेत. ॲलोपॅथी वापरणाऱ्या डॉक्टरांनी हे सगळे शोध आपल्या व्यवहाराशी जोडून घेतले आहेत आणि त्यामुळे सामान्य माणसांचा गैरसमज होऊ शकतो, की हे सगळे ॲलोपॅथीचेच ज्ञान आहे. पण हे ॲलोपॅथीचे ज्ञान नसून भौतिकशास्त्रांचे ज्ञान आहे".

आता आपण सर्जरी व ॲलोपॅथीच्या संबंधाचा विचार करू या. १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत सांस्कृतिक कारणांखेरीज इतर ४ महत्त्वाच्या कारणांस्तव सर्जरी युरोपमध्ये वाढली नाही. ती चार कारणे अशी :

१) भूल सापडली नव्हती, २) इन्फेक्शन म्हणजे काय कळले नव्हते व त्याच्यावर ताबा कसा ठेवायचा, याचे मोठे अज्ञान होते. ३) शरीररचनाशास्त्रातील काही अज्ञाने मोठी होती. म्हणजे भाग कापले म्हणजे सबंध शरीरावर काय दुष्परिणाम होतात, याविषयी मोठे अज्ञान होते व ४) रक्तस्रावाचे नियंत्रण कसे करायचे, माहिती नव्हते. ही चारही कारणे ॲलोपॅथीचे साक्षात विषय वा अंगे आहेत. या ॲलोपॅथीच्या अंगांची प्रगती झाली, म्हणूनच सर्जरी पुढे गेली. क्ष-किरणे व कापायची,

शिवण्याची इ. इ. हत्यारे यांनी सर्जरीतले यश अनेक पटींनी वाढते. तरीपण सर्जरी अॅलोपॅथीचे अंग नाही, हे विधान योग्य नाही. चरक व सुश्रुतात मूळ आयुर्वेद अष्टांगी म्हणजे सर्जरीसहच मानला आहे. सर्जरी म्हणजे वैद्यकाची ती शाखा, की जी जखमा, वेडे-वाकडे अवयव, अवयवांच्या नादुरुस्त्या व त्यांतून येणारी दुःखे व रोग, कापणे, जोडणे, शिवणे इत्यादी क्रियांनी बरे करते. अॅलोपॅथी काय, नाहीतर आयुर्वेद काय, सर्जरीपासून विभक्त करणे समंजस नाही.

तुमची दुसरी तक्रार आधुनिक शास्त्ररूपाविरुद्ध आहे. आधुनिक वैद्यक हे फिजिक्स, रसायनशास्त्र, जीवशास्त्र, सूक्ष्म-जीवशास्त्र, प्रतिकारशास्त्र, अनुवंशशास्त्र, मानसरसायनशास्त्र इ. अनेक शास्त्रांमधल्या प्रगतीवर, परिभाषांवर, कल्पनांवर अविरोध व अखंड अवलंबून आहे. अखंडपणा हा प्राण आहे.

अहो, हे रसायनशास्त्र, फिजिक्सशिवाय कळत नाही; जीवशास्त्र हे फिजिक्स, रसायनशास्त्र, सूक्ष्म-रसायनशास्त्र यांच्याशिवाय कळत नाही. म्हणूनच "अॅलोपॅथीच्या शास्त्रांशी त्या शोधांचा साक्षात् असा काहीही संबंध नाही...... हे अॅलोपॅथीचे ज्ञान नसून भौतिकशास्त्रांचे ज्ञान आहे..." ही तक्रार भांबावून टाकणारी आहे. शिवाय ही तक्रार, तक्रार म्हणून तगू शकत नाही. शिवाय तुम्हाला आधुनिक वैद्यक म्हणजे अॅलोपॅथीने भौतिक शास्त्रांशी केलेली व्यावहारिक तडजोड वाटते; उलट मला ती तात्त्विक अखंड रचना वाटते. थिअरी कशी असावी याचे जे आधुनिक, पाच कसोट्यांचे वर्णन आहे, त्यांतली एक कसोटी, "इतर शास्त्रांशी सुसंगती" ही आहे. ह्या कसोटीचे आधुनिक वैद्यक कसोशीने पालन करते. पाच कसोट्यांच्या थिअरीचे वर्णन या पत्राच्या शेवटी येणारच आहे.

अॅलोपॅथीवरचे तुमचे दुसरे मोठे दोन आक्षेप कायम आहेत. ते मला पुष्कळच मान्य आहेत.

(१) आयुर्वेदापेक्षा अनंतपट राजाश्रय असूनही अॅलोपॅथीला अनेक रोग असाध्य आहेत.

(२) अॅलोपॅथीतली औषधे रोग बरा करताना दुसरे दुष्परिणाम करतात. पुष्कळच मान्य पण सर्वस्वी मान्य नाहीत, असे मी म्हणतो याला खालील कारणे आहेत :

(अ) अॅलोपॅथीत जसे असाध्य रोग आहेत, तसेच आयुर्वेदातही आहेत. रोगांच्या एका वर्गीकरणात साध्य, याप्य, दुःसाध्य व असाध्य असे शब्द आयुर्वेदात येतात. असाध्य रोगांची आयुर्वेदात यादी लहान नाही. अॅलोपॅथीमुळे बऱ्या होणाऱ्या रोगांचीही यादी लहान नाही.

(ब) 'डी. एन्. ए' (D. N. A.) च्या इंजिनिअरिंगमधून शरीराशी जमेल असे मधुमेहासाठी नवीन इन्सुलिन तयार झाले आहे. हे इन्सुलिन नैसर्गिक इन्सुलिनपेक्षा वेगळे नाही; म्हणून इतर दुष्परिणाम नाहीत. हे उदाहरण केवळ सूक्ष्माकडच्या धावेमुळे, भविष्यात औषधांच्या दुष्परिणामी कचाट्यातून आधुनिक वैद्यक कसे सुटणार आहे याचे दर्शक आहे. दरवर्षी कमी कमी दुष्परिणाम करणारी औषधे शेकडो जन्माला येत आहेत, हेही खरे आहे. पाश्चात्त्य वैद्यकसंशोधकांना तुमच्या आक्षेपाची पुरी जाणीव आहे म्हणून औषधसंशोधनाचे खर्च अजस्र वाढत आहेत.

तरीदेखील तुमच्या आक्षेपांचे महत्त्व कमी होत नाही. आमचा डॉक्टर-विद्यार्थी विजय म्हणतो, तो औषधे जास्तीत जास्त टाळतो कारण त्याच्या मते जोराची सर्दी झाल्यानंतर औषध घेतल्यास आठवड्याने बरे वाटते ; न घेतल्यास सात दिवसांनी बरे वाटते. तुमचे आयुर्वेदाचे पुढील दोन दावे तर मोठ्ठे विचारणीय आहेत.

१. आयुर्वेदाला काही 'असाध्य' रोग साध्य आहेत.

२. आयुर्वेदातल्या औषधी इतर दुष्परिणाम टाळतात.

हे दावे आधुनिक वैद्यकीय संशोधकांनी दुर्लक्ष न करता तपासायला हवेत. भारत सरकारने या संशोधनाला मोठी मदत करायला हवी. पण डॉ. राम मला नुकताच म्हणाला, "भारतात आधुनिक वैद्यकीय संशोधनासही भारत सरकारची फारशी मदत नाही. भारतीय डॉक्टर पाश्चात्त्य संशोधनावरच फार अवलंबून आहेत." मी हे ऐकून कुंठित झालो.

आता मी तुमच्या इतर लेखनाकडे वळतो. मला तुमचे अनेक लेख आवडले. 'घर्षण चिकित्सा' 'अॅक्युपंक्चर' ... 'आयुर्वेदीय शोधांचा शोध

'आदर्श रुग्णालय', 'ऋतुपरत्वे आहारातील बदल', 'औषधीकाल', 'मलावरोध' हे लेख मला आयुर्वेदीय ज्ञानभांडारात प्रवेश करायला फार उपयोगी पडले. दैवकृत च्छिद्रे व मर्मे, अवेदन दंतोत्पाटन, रक्तश्रुति, मर्दन, डाग, सूक्ष्मीकरण, भस्मे, पुटप्रक्रिया, अमृतीकरण, आसवे, आरिष्टे, सुवर्णादि धातूंचे शारीरिक महत्त्व या अनेक महत्त्वाच्या आयुर्वेदीय शोधांचा व कामगिऱ्यांचा परिचय होऊन डोळे उघडले. अवेदन दंतोत्पाटन मी मात्र कधीही करून घेणार नाही. हिरडी बधीर करण्याचे इंजेक्शन देणे व मग दात प्लायरने उपटणे हेच मला पसंत आहे. सर्जरीत कधीही डॉक्टरांच्या चुकांसाठी शक्यता राहाता कामा नये. दात उपटायला मांसल अंगठ्यापेक्षा लोखंडी प्लायरच मला मान्य आहे.

तुमचे आणखीही इतर लेख मी बघितले. 'योगसाधक आयुर्वेदीय व प्राकृतिक निदान और चिकित्सा', 'सुप्रजोत्पादन का व कसे', 'सुंदर व सतेज संतती', 'प्रीति', 'पंचमहाभूतात्मक मानवी शरीराला पार्थिव द्रव्यांचा युक्तिपूर्वक उपयोग (पूर्वार्ध व उत्तरार्ध)' व 'जीवोत्तमा मानवी युवती' हे सर्व लेख सांख्य तत्त्वज्ञान व जुन्या काळापासून प्रचलित असलेल्या भारतीय आरोग्यविज्ञानांची सुरेख गुंफण आहे. तुमची लेखनशैली प्रासादिक पण मोजक्या शब्दांची, आचार्यांच्या आधारवचनांनी उचलून धरलेली व मार्मिक उदाहरणांनी गजबजलेली, सर्वांगसुंदर आहे. आधुनिक भौतिक शास्त्रांमध्ये आचार्य पैसापासरी; त्यांचे अधिकार (authority) मर्यादित असतात; बड्या गुरूंच्या वचनांतील चुका सापडवण्यासाठी धाकटे गुरू, शिष्यसुद्धा टपलेले असतात; शास्त्रज्ञांचा मुख्य धंदा व जबाबदारी म्हणजे पूर्वीच्या शास्त्रज्ञांना उखडणे. तुम्हाला अण्णा, चरकाचार्य किंवा सुश्रुताचार्य काय म्हणतात याचे फार महत्त्व आहे. दृष्ट, अनुमान व आप्तवचन ही सांख्यांची त्रिसूत्री प्रमाणपद्धती; तीच आयुर्वेदाची हवी व आहे. आयुर्वेदातले जे दृष्ट आहे ते योग्य दृष्ट आहे की नाही, हे त्याची प्रायोगिक पद्धती उत्तम तपासल्याखेरीज मला कळणार नाही. पण आप्तवचन हे आयुर्वेद शास्त्राला तारक आहे. आधुनिक भौतिक शास्त्रपद्धती शंकेच्या मार्गाने जाते. लक्ष्मणशास्त्री भारतीय आप्तवचन संदर्भवचनासारखे मानतात. मला त्या अर्थांतराविषयी शंका आहे. आबांचा अर्थ बरोबर असेल, तर योग्य दृष्टाचे विवेचन रज्जू–सर्पापलीकडे जायला हवे. असेही शक्य आहे की, यांत्रिक क्रांतीखेरीज योग्य दृष्ट कळू शकत नाही!

'दह्याचे अनिष्ट परिणाम' हा तुमचा लेख फार आगळा आहे. यात तक्ते आहेत, आकडे आहेत. एकूण लेखाचे रूप शास्त्रीय आहे. अनेक वाचकांच्या मनात दह्याविषयी शंका तुम्ही निश्चित निर्माण केली आहे. पण तुम्हाला स्वतःला या संशोधनात सहाध्यायी, विशेषतः आधुनिक शास्त्र शिकलेला सहाध्यायी, असता तर बरे झाले असते. औषधाचे वा अन्नाचे परिणाम तपासण्याचे प्रायोगिकशास्त्र शंका-पद्धतीने जाते. ती पद्धती त्रिपदी असते :

१) प्रयोग-व्यक्तिसंघ (Experimental Group) व संदर्भ-व्यक्तिसंघ (Control Group) असे दोन संघ करून तुलनेनेच परिणाम बघणे.

२) एकांध प्रयोग (Single Blind Experiment) करणे, म्हणजे प्रयोगसंघाला व संदर्भसंघाला काही प्रायोगिक माहितीपासून अंध ठेवणे.

३) उभयांध प्रयोग (Double Blind Experiment) करणे. म्हणजे प्रयोग करणाऱ्या व्यक्तींनादेखील काही बाबतींत अंध ठेवणे.

अनेक सामाजिक प्रयोगांत या शंका-पद्धतीला घट्ट चिकटून राहायचे असते. ही पद्धती फार किचकट व खर्चिक आहे. आहार व औषधे यांच्या सामाजिक परिणामांच्या अभ्यासासाठी श्रीमंत औषधी कंपन्या हे खर्च करतातच. तुम्हाला हे कसे जमणार? तरीपण आकडेशास्त्राची गरज तुमच्या लक्षात स्पष्ट आली आहे, याबद्दल फार आनंद झाला.

'रुग्णपरीक्षण प्रश्नावली' मी वाचली; विजयला दाखविली. आम्हा दोघांनाही ती आवडली. इतकी सर्वांगीण रुग्णपरीक्षा पूर्वी होती व हल्लीही तुम्ही करता, याचे आश्चर्य वाटले. हल्लीच्या 'होलिस्टिक मेडिसिन'च्या धर्तीचा दृष्टिकोन तुम्हा आयुर्वेदीयांमध्ये आहे, याचा आनंद झाला.

अण्णा, आता तुमच्या एका महत्त्वाच्या मुद्द्याकडे वळतो. "पाश्चात्त्य भौतिकशास्त्राची पदवी घेतलेले विद्यार्थी जर आयुर्वेदाचे शिक्षण घेण्यास पुढे आले, तर ते आयुर्वेदाचे शिक्षण डॉक्टरांपेक्षाही

चांगले घेऊ शकतील आणि त्यांचे ते अध्ययन आयुर्वेदाच्या दृष्टीने पुष्टिदायक ठरेल." मला वाटते, ही तुमची आशा तुम्ही ज्याला आयुर्वेद म्हणता, त्याच्या पुष्टीला वा तारणाला निराधार आहे. अनेक आयुर्वेदीय औषधे या भौतिक-शास्त्रज्ञांच्या निरीक्षणांतून टिकतील, काही असाध्य रोगांवरही सिद्ध औषधे निघतील, या गोष्टींची मला आशा व खात्री आहे. पण आयुर्वेदाची परिभाषा, कल्पना, उपचार-पद्धती व थिअरी म्हणजे तुम्ही म्हणता तो आयुर्वेद टिकणार नाही. भौतिकशास्त्रज्ञ तुमच्या आयुर्वेदाला रक्षतील, याबाबत मला शून्य आशा आहे.

माझ्या निराशेला दोन कारणे. ऐतिहासिक पुरावा हे एक. प्रायोगिक शास्त्रांची प्रगती हे दुसरे. चला इतिहासात मागे. इटलीमध्ये १००० ख्रिस्तशकाच्या सुमारास सलेर्नो विद्यापीठात. यूरोपमध्ये या काळी कोठलेही दुसरे विद्यापीठ वा विश्वविद्यापीठ प्रसिद्ध नाही. ग्रीक हिपोक्राटिस, अरब रझीस, पर्शिअन आव्हिसेना, रोमन गॅलन इत्यादी वैद्यांनी वाढवलेले वैद्यक येथे शिकवतात. या काळी फलज्योतिषावर रोग्याचे भवितव्य मोठ्या प्रमाणावर अवलंबून असे. शवच्छेदन मना असे. पुन्हा तपासायचे व अवलोकन महत्त्वाचे मानायचे, यापेक्षा पंडितांचा शब्द काय, याला महत्त्व होते. पुष्कळ वेळा चेटुकाचा शब्द त्याहीपेक्षा जास्त महत्त्वाचा होता. सलेर्नोमध्ये शिकायचे म्हणजे लॅटिन, ज्योतिष व वैद्यक शिकायचे. पदवीदानानंतर विद्यार्थी डॉक्टर होत असे. हा डॉक्टर चतुर्दोष वैद्यक शिके. रक्त, पिवळे पित्त, काळे पित्त व कफ हे धातू अथवा दोष (Humor) धडधाकट व्यक्तींत सम असतात व विषमतेने रोग बळावतो असे ते वैद्यक म्हणते. १२०० सालाला आता आपण पोचतो. आता चतुर्दोष पद्धतीवर आधारलेल्या आरोग्यनियम (Rule of health) नावाच्या महाग्रंथाचा डॉक्टर अभ्यास करतात. १६०० सालाला आरोग्यनियमाची १४० मुद्रणे झालेली आहेत. या ग्रंथात दिनचर्या, ऋतुचर्या, शारीर, रोग, उपचार (पंचकर्मवत्) इत्यादी विषय आहेत. १६०० सालाला चतुर्दोषी वैद्यक यूरोपभर विजयी आहे. पॅरिस, केंब्रिज, मॉंटपेलिअे येथे हेच वैद्यक शिकवतात. मॉंटपेलिएला विषशास्त्रात स्त्री ही विषारी प्राणी मानली आहे. पॅरिसला तर १४०० सालापर्यंत सर्जरी बेकायदेशीर आहे. पुढे ती केव्हा कायदेशीर झाली, मला माहीत नाही.

चवदाव्या शतकात प्रायोगिक प्रगतीचे नवे वातावरण येत आहे. १५व्या शतकात इटलीत प्रबोधनाची पहाट आहे. मिलानमध्ये व्हींची मानवी शरीराच्या अवयवांची तपशीलवार चित्रे काढतो आहे. १६व्या शतकात पादुआला प्रोफेसर व्हेसेलिअस मानवी शरीररचनेवर प्रत्यक्ष तपासणीतून तयार केलेले पुस्तक अनावरण करतो. रोममध्ये युस्टाशिआला कितीतरी नवीन अंतर्गत अवयव सापडत आहेत. मूत्रपिंड व कानांतले आतले भाग पाहून तो आश्चर्यचकित आहे. पारासेल्ससला सर्जरी व वैद्यक यांच्यातली दरी दिसते आहे. तो चव्हाट्यावर विफलतेमुळे बेधडक जुने वैद्यक ग्रंथ जाळतो, हे दृश्य अलौकिक आहे. हार्वेला पादुआमध्ये रक्ताभिसरण सापडते. पॅरिसच्या डॉक्टरांनी हार्वेला वाळीत टाकण्याचे ठरवले आहे. लुवनहुक नावाच्या व्यापाऱ्याने सतराव्या शतकात २००च्यावर मायक्रोस्कोप तयार केले. त्याला जंतू व रक्तपेशी दिसल्या. प्लेगच्या रोग्यांत कीर्शरला बारके किडे दिसत आहेत. इंग्लंडमध्ये हुक (तो फिजिसिस्ट व रसायनशास्त्रज्ञ होता) याला श्वसन व त्याच्या सहाध्यायाला हवा व रक्त यांचा संबंध कळला. आणि याच सुमारास जे कॅथॉलिक नाहीत त्यांना इटलीत विश्वविद्यापीठात प्रवेश मिळेनासा झाला. या यंत्र व तंत्राच्या स्फोटांनी धर्माधिकारी, तत्त्वज्ञ, डॉक्टर खवळले आहेत. आता अठरावे शतक जवळ आले आहे. जरी प्रबोधनयुग सुरू होऊन सहज दोनशे वर्षे गेली, तरी जादूटोणा संपलेला नाही. पण भौतिक शोधांचा वेग आता वाढला आहे. लुई पाश्चर हा रसायनशास्त्रज्ञ फ्रान्समध्ये जंतूंचा संबंध 'फर्मेंटेशन' आणि रोगांशी लावू लागला आहे. आणि काय कोणास ठाऊक, १६०० साली दिग्विजयी असलेले चतुर्दोषी वैद्यक पुढे २५० वर्षांत भौतिक शास्त्रज्ञांच्या प्रायोगिक कामांतून ऱ्हासाला गेले. हे बहुतेक भौतिक शास्त्रज्ञ डॉक्टर नव्हते. ते यंत्र व तंत्र यांच्या साहाय्याने केवळ अवलोकनावर भरवसा ठेवणारे नवीन परंपरेचे वैज्ञानिक होते. पाश्चरने जंतूंमुळे फर्मेंटेशन कसे होते व मेंढ्यांना

अनुक्रमणिका

'अॅन्थ्रॅक्स' हा रोग **कसा** होतो हे दाखवले व आता तदनंतर १३० वर्षांत जगभर डॉक्टर, युरोपीय चतुर्दोषी वैद्यक टाकून, जंतूंसारखे पसरले आहेत. अण्णा, विचार करा, काय झाले ?–

मी माझ्या समजुतीसाठी चतुर्दोष वैद्यकाचा छोटा तक्ता केला; केवळ रूप दुरून समजावे यासाठी. तो तक्ता असा :

## युरोपीय चतुर्धातु–वैद्यक

| दोष / धातु (Humor) | गुण | महाभूत | ऋतू | मानवस्वभाव |
|---|---|---|---|---|
| रक्त | गरम | अग्नि | उन्हाळा | आशावादी इत्यादी |
| पिवळे पित्त | वाळके | वायु | वसंत | चिडखोर इत्यादी |
| काळे पित्त | ओले | पृथ्वी | शरद | निराश इत्यादी |
| कफ | थंड | जल | शिशिर | आळशी इत्यादी |

मी असाच एक प्राथमिक त्रिदोषी आयुर्वेदाचा तक्ता तयार केला. तो पुढे देत आहे. हा तक्ता तयार करण्यास तुमचे आयुर्वेद जीवशास्त्र हे पुस्तक पुष्कळसे उपयोगी पडले. हा तक्ता केवळ ठोकळ रूप कळण्यासाठीच आहे.

## भारतीय त्रिदोष / त्रिधातु वैद्यक

| प्रकृति दोष/सांख्य | गुण | महाभूत | प्रकोप ऋतू | मानव स्वभाव/लक्षणे | अन्न |
|---|---|---|---|---|---|
| रक्त ? | | | | | |
| वात (रज) | हलके, रूक्ष, थंड, चल इ. | अग्नि<br>हवा<br>पृथिवी<br>जल<br>आकाश | वर्षा | चलाख, निधर्मी, गाणे आवडणारा, बारीक, उंच इ. | तिखट तुरट |
| पित्त (संतापात्मक) | सर तीक्ष्ण ऊष्ण, द्रव इ. | | शरद | शूर, अभिमानी, अंगावर केस कमी, लवकर पांढरे केस इ. | आंबट |
| कफ (तम) | जड, स्निग्ध थंड घट्ट इ. | | वसंत | विश्वासू, सत्यप्रिय, धिमा, अल्पभक्षक, पुष्कळ मुले इ. | गोड |
| सत्त्व | | | | | |

अनुक्रमणिका

हे दोन्ही तक्ते मी न्याहाळले आणि साक्षात्कार झाला, की अठराव्या-एकोणिसाव्या शतकांपूर्वीचे युरोपीय वैद्यक **हे** आयुर्वेदाचा एक अवतार आहे. भारतीय आयुर्वेद हा युरोपीय अवतारापेक्षा खात्रीने जुना आहे. वातीकर, वातीकृत हे 'अथर्ववेदी'य शब्द आहेत. असेही कळते की, बौद्धवैद्यकही आयुर्वेदीय होते. माझ्या या सर्व ऐतिहासिक आढाव्यातून हे स्पष्ट होते, की प्राचीन आयुर्वेदाचा यूरोपीय अवतार प्रबोधनयुगाच्या आरंभापासून अंधुक होऊ लागला व लुई पाश्चर ह्या रसायनशास्त्रज्ञ-सूक्ष्मजीवशास्त्रज्ञांच्या अवतारानंतर गडप झाला. आता विसाव्या शतकात भौतिकशास्त्रज्ञांच्या हाती आयुर्वेद देणे, म्हणजे कसायाच्या हाती गाय देणे होईल.

शास्त्र, विशेषत: भौतिकशास्त्र, एका अर्थी कार्यकारणविवेचन असते. **कारण** या शब्दाचा ग्रीक तत्त्वज्ञान्यांकडून जो अर्थ आला होता, तो न्यूटन, गॅलिलिओ आदी नवशास्त्रज्ञांनी फेकून दिला. वस्तू **का** हलते ?– या फिजिक्सच्या प्रश्नाला तत्त्वज्ञ ॲरिस्टॉटलचे उत्तर : 'हवा'! शास्त्रज्ञ न्यूटनचे उत्तर ; 'मला निश्चित माहिती नाही, **का**. कदाचित गुरुत्वाकर्षणाचा जोर हे कारण असेल. पण ते मला माहिती नसले, तरी वस्तू **कशी** व **किती** हलते, हे मी तीन नियमांनी सांगतो.' देकार्त ह्या फ्रेंच गणिती शास्त्रज्ञाने हे उत्तर ऐकले व तो चाट झाला. '**का** हे उत्तर नाहीसे झालेले हे शास्त्र कसे ?' असे त्याला वाटले. पण तरीदेखील हळूहळू त्याच्या लक्षात आले, की नवीन शास्त्रे माणसाची मोठ्ठी प्रगती तंत्रविद्या व वैद्यकात करतील.

भारतीय तत्त्वज्ञानातही ग्रीक तत्त्वज्ञान्यांपेक्षा **का** शब्दाला अधिक अर्थ नव्हता. भारतीय सांख्य तत्त्वज्ञान आयुर्वेदीय शास्त्राचा पाया ! 'नाही ते आहे करता येत नाही म्हणून, सगळेच संभवते असे नसल्यामुळे, ज्यांच्यात ताकद आहे त्यातूनच शक्य असते व उपादानत्वामुळे कार्य-कारणव्यापाराच्या पूर्वीच म्हणजे प्रकटीकरणाच्या पूर्वीच अस्तित्वात असते.' ही नववी सांख्यकारिका मला आबांनी शिकवली आणि सांख्यांच्या **कारण** शब्दाचा अर्थ म्हणजे उपादान व निमित्त. जीव–रसायनशास्त्रातला प्रश्न घ्या. दुधाचे दही **का** होते ? सांख्यांचे उत्तर : '**कारण** दूध हे उपादान व गृहिणी, भांडे इ. निमित्ते'. सांख्यांच्याही कारणात **कसे** व **किती** नाही. आयुर्वेदीयांच्या पंचकर्मात, औषधीकरणात **कसे** व **किती** असले, तरी त्रिदोष पद्धतीच्या रोग थिअरीमध्ये **कसे** व **किती** नाही. पाश्चरने **कसे** व **किती** ही फर्मेंटेशनच्या थिअरीत व जंतूंनी घडणाऱ्या रोगांच्या थिअरीत सांगितली. म्हणून दही **का** होते, हे कळते. अँथ्रॅक्सच्या जंतूंच्या एका विशिष्ट प्रसार–प्रक्रियेने मेंढ्या रोगी होऊन मरतात व त्या जंतूंची मलूल लस टोचल्यास मेंढ्या मरत नाहीत, हे पाश्चरने सिद्ध केले व रोगाचे पारंपरिक गृहीत बदलले. त्या काळच्या यूरोपीय आयुर्वेदावतारातल्या वैद्यांनी अगदी अलीकडे, सव्वाशे वर्षांपूर्वी, पाश्चरला सांगितले, 'रोग कसा होतो हा तुझा विषय होऊ शकत नाही. तो धर्मज्ञांचा विषय आहे !'

पाश्चरच्या अगोदर २,००० वर्षे ग्रीक जगतात आर्किमिडीजने **कसे** व **किती** विचारणाऱ्या– आज ज्याला शास्त्रीय पद्धत म्हणतात– त्या पद्धतीचा पाया घातला. तार्किकांनी व तत्त्वज्ञान्यांनी करडा अम्मल चालवलेल्या ग्रीक जगतात आर्किमिडीजचे महत्त्व कळले नाही व पुढे १८०० वर्षे भौतिक शास्त्रे झोपली. ॲलेक्झांडरला त्याचे बंदबुद्धीचे गुरू माहिती होते. म्हणून ग्रीसच्या बाहेर ॲलेक्झांड्रिआमध्ये व इतर ठिकाणी आत्मगौरव म्हणून विद्यापीठे स्थापण्याचा त्याने प्रयत्न केला. प्रबोधनयुगाच्या प्रभाती पुन्हा शास्त्रीय पद्धतीचे पुनरुज्जीवन भौतिक शास्त्रज्ञांनी सुरू केले. शास्त्रसिद्धीसाठी पंडिती पक्ष–प्रतिपक्ष पद्धती अपुरी दिसायला लागली; भौतिकशास्त्रीय गृहीत–प्रयोग पद्धती वर आली. वैद्यकशास्त्रात जर विशिष्ट जंतू एखाद्या रोगाचे कारण असेल, तर कॉखच्या चतुष्पदी पद्धतीनेच ते सिद्ध करावे लागायला लागले.

१) विशिष्ट रोगाच्या सर्व आजाऱ्यांत तो जंतू असायला हवा.

२) तो जंतू शुद्ध कल्चरमध्ये निर्माण करता यायला हवा.

३) त्या कल्चरने सूचिभरण केल्यावर निरोगी व्यक्तीत तो रोग निर्माण करता यायला हवा व

४) तो जंतू रोग्यातून पुन्हा बाहेर काढता यायला हवा.

अनुक्रमणिका








पण सगळे रोग जंतुज नसतात. तरीपण काय बिघडले ? – शास्त्रीय पद्धती मग शंकापद्धतीच्या नवीन अवतारात प्रकट करावी लागते, एवढेच.

शास्त्रीय पद्धतीचा पाया म्हणजे मार्मिक अवलोकन. दूरदर्शन्या वा सूक्ष्मदर्शन्या लागतातच. गृहीत व प्रयोग पद्धतीत गृहीतांच्या समर्पक निवडीसाठी या यंत्राखेरीज व अनेक तंत्रांखेरीज शास्त्रीय पद्धती पोकळ होते. त्रिदोष गृहीताबद्दल सुश्रुताचार्यांचे व चरकाचार्यांचे असमाधान मला त्यांच्या निरनिराळ्या रोग-वर्गीकरणांतून जाणवते. (१) वात-पित्त-कफज, (२) निज-आगन्तु-मानस, (३) आगन्तु-शारीर-मानस-स्वाभाविक (सहज) (४) आदिबलप्रवृत्त, जन्मबलप्रवृत्त, दोषबलप्रवृत्त, संघातबलप्रवृत्त, कालबलप्रवृत्त, दैवबलप्रवृत्त, स्वभावबलप्रवृत्त, (५) त्रिदोषज व कर्मज इत्यादी. आचार्यांचा हा बहुविध वर्गीकरणाचा यत्न मला सरळ त्रिदोषाखेरीज अधिक समर्पक गृहीतांचा शोध वाटतो. काहीही वर्गीकरण करा, तरी सर्व रोगांचा पाया त्रिदोषच हे केवळ आप्तवचन वाटते. सुश्रुताचार्यांपाशी जोरदार मायक्रोस्कोप असता, तर त्यांनी म्हटले असते की आदिबल-दैवबल-जन्मबलप्रवृत्त रोग काही जंतुज असतात व काही D. N. A. दोषज असतात. गृहीत कसे निवडायचे, या विषयात १६०० सालाच्या सुमारास क्लेव्हिअसने समर्पकता तत्त्वाचा समावेश केला. ते तत्त्व का महत्त्वाचे, हे खालील दोन थिअरींच्या चुरशीतून कळते.

थिअरी १ :

गृहीते :
- अ) सगळ्या रेडिओ ताऱ्यांपाशी जोरदार चुंबकीय क्षेत्र असते.
- ब) जोरदार चुंबकीय क्षेत्रातले सगळे तारे क्ष-किरणे देतात म्हणून सगळे रेडिओ तारे क्ष-किरणे देतात.

थिअरी २ :

गृहीते :
- अ) सगळ्या रेडिओ ताऱ्यांना अतिघन गाभे असतात.
- ब) अतिशय घन गाभे असलेले तारे क्ष-किरणे देतात. म्हणून सगळे रेडिओ तारे क्ष-किरणे देतात.

केवळ तार्किक दृष्टचा दोन्ही थिअऱ्या **बरोबर** आहेत. पण समर्पक गृहीताखेरीज सत्यज्ञान नाही. समर्पक गृहीतांसाठी उत्तम अवलोकन, त्यासाठी उत्तम यंत्रे व तंत्रे लागतात. आयुर्वेद उत्तम यंत्र-तंत्रांना मुकला. म्हणून त्रिदोष गृहीत समर्पक आहे की नाही, हे ठरवता येत नाही. प्रबोधनयुगात यूरोपीय आयुर्वेदावताराचे मात्र चतुर्दोष गृहीत यंत्रतंत्रांनी असमर्पक ठरले गेले.

आधुनिक वैद्यक हे इतर भौतिकशास्त्रांची जी एक सामान्य शास्त्रपद्धती आहे, ती अनुसरते. अनेक सामाजिक शास्त्रेही हीच पद्धती, असुलभ असतानाही, खर्चिक असूनही वापरतात. थिअरी हे शास्त्रीय पद्धतीच्या रस्त्यावरचे स्वर्गद्वार आहे. फिजिक्स, रसायनशास्त्र, जीवशास्त्र व इतर काही शास्त्रे त्या स्वर्गद्वाराच्या जवळ आहेत, असा काही वेळेस भास होतो. शंकावर्तुळात अनेक वेळा थिअऱ्या घेऱ्या घालताना दिसतात. शास्त्रीय पद्धती मूलतः शंकापद्धती आहे. निसर्गाचे योग्य अवलोकन, योग्य प्रयोग, योग्य गृहीत, योग्य नियम, मग अकस्मात् विरोधी अवलोकन, पुन्हा प्रयोग, पुन्हा नवीन गृहीत, नवीन नियम, या नवीन नियमांची जुन्या नियमांशी जुळण, पुन्हा विरोधी अवलोकनांचा शोध, पुन्हा श्रीगणेशाय नमः अशी शास्त्रीय पद्धती असते. या इतक्या विशेष काळजीनंतरही आधुनिक शास्त्रातली थिअरी सारखी डळमळीत असते व तिची सारखी डागडुजी चालते. स्थिर, संपूर्ण थिअरी हे मृगजळ आहे.

प्रायोगिक शास्त्रांची थिअरी कशी असली पाहिजे याच्या पाच कसोट्या आहेत :

१) ती सोपी हवी. काही लोक म्हणतात सुंदर हवी. काहीही असो, थोड्या पण समर्पक गृहीतांची ती हवी.

२) स्वतःच्या विश्वातल्या सर्व अवलोकनांशी ती सुसंगत हवी.

३) भाकिते वर्तवण्यात ती तरबेज हवी.

४) परक्या विश्वातल्या म्हणजे इतर शास्त्रांतील अवलोकनांशी ती सुसंगत व अविरोधी हवी.

५) थिअरी तत्त्वतः संपूर्ण सिद्ध करता येत नाही, म्हणून तिच्या सिद्धीच्या मर्यादा म्हणजेच



अनुक्रमणिका

तिच्यात चूक काय, हे कळले पाहिजे. दुसऱ्या शब्दांत म्हणायचे, तर थिअरी तत्त्वत: स्खलनशील हवी.

आयुर्वेद पहिल्या तीन कसोटया उतरण्याची शक्यता मी नाकारत नाही. चवथी कसोटी भौतिकविज्ञानांच्या प्रगतीपूर्वी सांख्यपदार्थविज्ञानाच्या सुसंगतीमुळे पाळली गेली होती. पाचवी कसोटी शास्त्रीय पद्धतीचा म्हणजे शंकापद्धतीचा प्राण आहे. पाचवी कसोटी सांगते, थिअरी सांख्य प्रकृतीप्रमाणे चंचल नर्तकी आहे. जशी नर्तकी नाटकगृहात नृत्य संपवून नाहीशी होते, तशी थिअरी पुरुषापुढे प्रदर्शन करून गुडुप्प होते.

प्रायोगिक शास्त्रांची थिअरी स्खलनशील का असते, याचे गोळाबेरीज स्पष्टीकरण असे :

विश्व म्हणजे विषय.

अ व ब ही प्रस्तुत विश्वातली अवलोकने गृहीत धरा.

क–१, क–२, क–३, क–४, क–५...... इत्यादी प्रस्तुत विश्वातली अवलोकने वा भाकिते समजा. मग आपण प्रस्तुत विश्वाची खालील तार्किक आकाराची थिअरी मांडू शकतो.

जर अ आणि ब, तर क–१, तर क–२, तर क–३, तर क–४... इत्यादी. इत्यादी कधीही संपत नाही म्हणून थिअरी तत्त्वत: संपूर्ण सिद्ध करणे अशक्य! पण जरी एकच अवलोकन विरुद्ध गेले वा एकच भाकीत– उदाहरणार्थ, क–१७६५ चे भाकीत चुकले तरी सगळी थिअरी कोलमडते. प्रकाशाची गती ईथरच्या वेगाच्या दिशेवर अवलंबून आहे, हे अभिजात फिजिक्सचे भाकीत, मायकेलसन-मोर्ले यांच्या १८८७ मधल्या प्रयोगांतून चुकीचे ठरले आणि न्यूटोनिअन फिजिक्सचा अंत झाला. आता आइन्स्टाईनच्या थिअरीतल्या चुकीवर शास्त्रज्ञांचा डोळा आहे. प्रस्तुत थिअरी मारणे म्हणजेच शास्त्रीय काम करणे.

अण्णा, मी आयुर्वेदाचा तुमच्याइतका जीवाभावाने पाठीराखा नाही म्हणून माझ्यावर रागवून बसू नका. तुम्ही वैद्यकीक्षेत्रात प्रखर क्रीडापटू म्हणून गाजले आहात. क्रीडापटूचा दिलदार स्वभाव सोडू नका.

अण्णा, माझ्या लिखाणाने निराश होऊ नका. आयुर्वेद शृंगापत्तीत आहे हे खरे असले, तरी तुमच्यासारखाच मला आयुर्वेद जगला पाहिजे, असे वाटते. फक्त तुमचे पाश्चात्त्य वैद्यकाविषयी जे काही थोडे गैरसमज आहेत ते मला या पत्राच्या संधीमुळे दूर करायचे आहेत. भारतीय विज्ञानशास्त्रांच्या इतिहासातले आयुर्वेद हे सर्वात सुंदर रत्न आहे. भारतात जे चार-पाचशे प्रामाणिकपणे आयुर्वेदाची सेवा करणारे वैद्य आहेत, त्यांच्याविषयी मला मोठा आदर आहे. सामान्य जनतेला, सामान्य वैद्यांना व बहुतेक डॉक्टरांना आयुर्वेदाची परवा नसूद्यात. तुम्ही स्वत: व इतर मोठे काही वैद्य अनेक असाध्य आजाऱ्यांना बरे करत आहात. प्रायोगिक शास्त्रांत नेहमी आश्चर्यकारक अवलोकने घडत असतात. म्हणून शास्त्रज्ञ, पंडित व माझ्यासारख्या पोटभरू वावदुकांचे तुम्ही न ऐकणेच श्रेयस्कर! डॉक्टर लोक भारतात काय; इतरत्र काय; कारखान्यात जशी गाडी दुरुस्तीला येते व बाहेर जाते तसे रोग्यांना वागवतात. त्यांच्या मौर्ख्याबद्दल तुम्ही त्यांना चावा घेता, हे मला फार आवडते. सर्व जग फसवे आहे. पण बरे झालेले असाध्य रोगी व तळमळीने त्यांना बरे करणारे अण्णा एवढेच काय ते मंगल सत्य आहे.

आज्ञाधारक तुमचा

मधुकर





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# *प्रायोगिक रंगभूमी आणि लोककला

अशोक दा. रानडे

विषयाच्या विवेचनास सुरुवात करण्याचा घाट घातला की, लगेचे व्याख्येची अडचण भासूं लागते. व्याख्या नाही तरी लक्षणे नोंदवावीत, असा मध्यम-मार्गही सुचतो. पण तसे पाहता प्रायोगिक म्हणजे काय ? रंगभूमी म्हणजे काय ? इत्यादी प्रश्नांची उत्तरे अजूनही गृहीत धरण्यासारखी परिस्थिती नाही का ? असेही विचारावेसे वाटते. या सर्वांची व्याख्या कसोशीने झालीही नसेल; पण समाजातल्या दृढ जाणीवा, त्या शब्दबद्ध (व निदानपक्षी लिखित) झाल्या नसल्या, तरीही अस्तित्वात नसतात असे कसे म्हणावे ? मेजावरल्या दिव्याच्या ढाकणाची सावली नक्की कुठे संपते हे सांगता येत नसले, तरी ती संपते व असते हे सर्वांना कळत नसते काय ? मुद्दा असा की, मूलभूत म्हणता येणाऱ्या संकल्पनांना व निगडित व्यवहारांना, काटेकोरपणे संज्ञारूप देणे इष्ट खरे; पण प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीने ते किती अपरिहार्य आहे ? व्यवहार चालू असतो आणि त्याचे निरीक्षण करत करत प्रयोग चालू असतात. या प्रयोगात जाणीवांना जे रूप लाभत असते ते महत्त्वाचे; कारण प्रयोग विद्वत्परंपरेशी फटकून राहत नसला, तरी तिच्या चार पावले पुढे असतो. म्हणूनच प्रयोगाची चर्चा तातडीने व्हावी, प्रयोगांच्या चर्चेची चर्चा हा दूरचा प्रवास नंतर. प्रयोग व प्रयुक्ताची चर्चा यावर भर हवा.

प्रायोगिक रंगभूमीच्या संदर्भात तर, प्रयोगातल्या जाणीवा आणि त्यांना तात्त्विक, वैचारिक पार्श्व-भूमीचे निश्चित अधिष्ठान लाभणे यात कालांतर जास्त राहणे अपरिहार्य आहे. कारण प्रायोगिक रंगभूमी ही मार्गच्युत वा मार्गेतरित रंगभूमी असते. प्रायोगिकता म्हणजे, खरे तर जे रूढ असते त्या-पेक्षा निराळे राहावे या प्रबळ ऊर्मीतून निर्माण झालेली प्रयोगरूपे असतात. प्रायोगिकतेला कला-विचारापेक्षा सामाजिक-सांस्कृतिक प्रेरणा कार्यकारी म्हणून जवळच्या वाटणाऱ्या असतात. प्रयोगाला कलारूप लाभले न लाभले तरी, त्याची पर्वा न करता आविष्कार करणे हेच प्रायोगिकतेचे प्रथम लक्ष्य असते. तिला कलारूपाचे वावडे नसते; पण निराळा मार्ग शोधणे, स्वतःचे वेगळे अस्तित्व शोधणे व ते ठामपणे, संघटितपणे समाजापुढे मांडून आपला सवतासुभा निर्माण करणे, याकडे प्रायोगिकतेचा मोहरा असतो. प्रायोगिकतेचा ओढा समाजातल्या ज्या गटांना भासतो, त्या गटांच्या सामाजिक जाणीवा कलात्मक जाणीवांपेक्षा तीव्र असतात. भारतीय संदर्भात एक महत्त्वाचा धागदोरा असा की, प्रायो-गिकतेच्या सामाजिक संदर्भामुळे आविष्कारात सामूहिकतेला ( एकल आविष्कारापेक्षा ) भरपूरच नव्हे तर नियमितपणे स्थान मिळते. 'घाशीराम कोतवाल' ते 'अल्वारा डाकू' या प्रवासात समूह प्रभावी राहतो, तो या कारणामुळे. भारतीय जीवनसरणीत कलात्मकता व एकल आविष्कार यांचे नाते ( प्रयोगकलांच्या बाबतीत तरी ) अतूट आहे. या नात्याला छेद देणे प्रायोगिकतेच्या आंत-रिक आणि प्रबळ गरजांमुळे आवश्यक ठरत असते. कलात्म म्हणून उभे राहणारे व कलात्म म्हणून यथातथा योग्यतेचे ठरणारे प्रयोगही सांघिक-सामूहिक का असतात, याचा विचार प्रायोगिकतेच्या तत्त्वचर्चेत व्हायला हवा. केवळ कलादृष्टया यशस्वी प्रायोगिकता तपासणे हा वैचारिक पळपुटेपणा झाला ! सामाजिक जाणीवा जमावातून व्यक्त करता येत नाहीत, हे ज्या प्रयोगकर्त्यांना उमगते त्यांचे

---

* 'नवभारता'च्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या रंगभूमी–विशेषांकासाठी डॉ. अशोक रानडे ह्यांचा हा लेख आम्ही मागवला होता. तो येण्यास विलंब झाल्याने विशेषांकात अंतर्भूत होऊ शकला नव्हता. तथापि ह्या अंकात तो आम्ही वाचकांना सादर करीत आहोत. –संपादक

अनुक्रमणिका

जमाव, जमाव न राहता संघ बनतात. हा कलात्म लाभ खरा, पण हा लाभ करून घेणे अशी प्रेरणा मात्र कार्यकारी होत नसते !

इथे एक प्रश्न निर्माण होतो. (निदान तो निर्माण व्हायला हवा !) सामाजिक जाणीवा हे प्रायोगिकतेचे मूळ कारण मानले तर या जाणीवा समाजाच्या सर्व थरांत असणे तर्कप्राप्त आहे. परिणामतः प्रायोगिकतेचा आढळही सर्व थरांत दिसायला नको काय ? एक सांस्कृतिक मेख ध्यानात न घेतल्यास हा प्रश्न निरुत्तर करणारा वाटतो. प्रस्तुत संदर्भात आविष्कार रंगभूमीच्या माध्यमाद्वारे कसा होतो, याचा तपास घ्यावयाचा आहे. त्यातही पुन्हा फारसे स्पष्ट नसलेले गृहीत म्हणजे रंगभूमीच्या नाटकीय आविष्कारांना विचारात घ्यावयाचे बंधन आहे. म्हणजे मदारी-डोंबारी यांचे खेळ, हंडीबाग-नकल्या, बहुरूपी इत्यादींचे आविष्कार विचाराच्या परिघाच्या बाहेर राहतात. प्रयोगकलांच्या संदर्भात तसे पाहता आदिम, लोक, जनप्रिय व कला इतक्या आविष्काराच्या मूलभूत कोटी असतात. या सर्व कोटींत सामाजिकतेचा आवाज उमटतो. पण प्रायोगिक रंगभूमी या माध्यमाशी आदिम व लोक या कोटींचा संबंध स्वरूपमर्यादांमुळे येत नाही. मुद्दा असा की, सांस्कृतिक-सामाजिक प्रेरणांपैकी केवळ सामाजिक प्रेरणा असून भागत नसल्याकारणाने प्रायोगिकता आणि रंगभूमी यांचे नाते समाजातील सर्व थरांच्या संबंधांत कल्पिता येत नाही. आपल्याला आवडो-नावडो; पण प्रायोगिकता हा नागर धर्म आहे. नगर, पांढरपेशा वर्ग, मौखिक परंपरेला सर्व बाजूंनी सुरुंग, जनसंपर्कमाध्यमांखेरीज इतर संस्कारक संस्थांना लागणारी उतरती कळा इत्यादी अनेक लक्षणांनी नागर धर्म सिद्ध होत असतो. नागर धर्माचे प्रायोगिकतेशी आंतरिक नाते असते आणि प्रायोगिकतेचे आविष्कार कोणते रूप धारण करतात, हे नागर धर्माच्या प्रेरणांवर, क्षमतांवर अवलंबून असते. प्रदेशाच्या वा देशाच्या एकंदर सांस्कृतिक प्रमाणमानात फरक असू शकतात. यामुळे त्या त्या देशीय प्रायोगिकतेतही भेद राहणे अपरिहार्य असते. म्हणजे असे की, (भारताच्या संदर्भात पाहता) राजस्थान, मध्य प्रदेश, बंगाल वा तामिळनाडू इत्यादी सर्व प्रदेशांत नगरे असतात. पण तरीही नगरांनगरांतल्या प्रायोगिकतेत फरक पडतो, कारण सर्व नगरे समान प्रमाणात नागरी नसतात (यात पुन्हा महानगर-संस्कृतीचा कोटिभेद करणे शक्य व अधिक तपशीलवार चर्चेसाठी गरजेचेही ठरेल, याची नोंद ठेवली पाहिजे). प्रायोगिक रंगभूमीच्या संदर्भात नागरी जीवनाचे प्रस्तुत ठरणारे लक्षण आधुनिकतेची ओढ हे होय. आधुनिकतेच्या ओढीने अनेक सामाजिक जाणीवांना व्यवहारात विशिष्ट रूप लाभते. सांस्कृतिक व्यवहारांत कला-कारागिरी या प्रगटीकरणाच्या मार्गांना महत्त्व देणे नागरी धर्माला जवळचे व सुलभ असते. परिणामतः प्रायोगिकता, रंगभूमी व आधुनिकता यांची माळ लागते.

आधुनिक, अर्वाचीन या संज्ञा तशा समानार्थीच. पण कदाचित एक भेद मूलार्थाच्या आधारे करता येईल व तो वेधक वाटेल. आधुनिक म्हणजे कालिक दृष्ट्या नजीकचा व अर्वाचीन म्हणजे प्रादेशिक दृष्ट्या अलीकडचा, जवळचा इत्यादी. मुद्दा असा की, याही दोन संज्ञा व संकल्पना निखळपणे कलाविचारातल्या नाहीत. नगरे व नागरिकता यांच्या दिशेने मोहरा ठेवणे व चालू वर्तमानकाळाशी सूत जमविणे अशा दोन्ही प्रेरणांनी नागर धर्म जीवनसरणीचा पट विणीत असतो. आजच्या गरजा पुऱ्या करणे, हे आधुनिकतेला महत्त्वाचे वाटत असते. शाश्वत, टिकाऊ इत्यादींपेक्षा झटपट सिद्ध होणारे आणि गरज संपताच फेकून देता येईल इतक्या(च) ताकदीचे कल्प उपलब्ध व्हावेत अशी आधुनिकतेची मागणी असते. परिणामतः सखोलतेपेक्षा वरवरचे, तपशीलापेक्षा ठसठशीत ढोबळपणाकडे, तार्किक / तात्त्विक तथ्यापेक्षा सहज प्रत्ययाला जे येत असते, त्याकडे आधुनिकता झुकलेली असते. आधुनिकतेची ही लक्षणे दोष म्हणून पाहण्याचे कारण नाही. स्वस्थानी असेपर्यंत दोषही गुण / धर्म असतो, असा काहीसा आयुर्वेदिक न्याय इथे लावावासा वाटतो! सारांश, आधुनिकतेच्या कार्यपद्धतीचे भान ठेवल्यामुळे प्रायोगिकतेचे अनेक अंगभूत घटक तसे का याचा उलगडा होऊ शकतो.

चालू काळाबरोबर पावले टाकणे आधुनिकतेच्या अंगभूत लक्षणांत जमा होते. अर्थात असा की, परंपरेच्या पुढे जाण्यात परंपरेबरोबर फटकून वाग-

अनुक्रमणिका

ण्याचा धोका पत्करावा लागला तरी चालेल, अशी आधुनिकतेची भूमिका असते. प्रायोगिकता आणि आधुनिकता यांच्या दरम्यान समान दुवा सापडतो तो इथे. दोघांची धाव वेगळेपणाकडे असते. सामाजिकता–नागर धर्म–आधुनिकता व प्रायोगिकता या आगगाडीला रंगभूमीचे इंजिन लावल्यावर 'लोक' कोटीकडे पोचणे कसे तर्कप्राप्त आहे, याचा बोध आता सहज व्हावा. नागर रंगविणाराला वेगळेपण लाभू शकते, ते 'लोक' कोटीकडे वळण्यातूनच ! आदिम कोटीपर्यंत पोचणे, नागरी आविष्कारांना आणखी एक पायरी पार करूनच शक्य असते आणि नागरी सरणीच्या सर्वसमान क्षमतेत हे बसत नाही ! यामुळे अनेकदा आदिम व लोक आविष्कारांत भेद करणेसुद्धा नागर संवेदनेस जमत नाही ! सरमिसळ वेगळेपणा चालेल; पण वेगळेपणा हवा, अशी भूमिका दिसू लागते. पांढरपेशांची खेडुती जीवनाविषयीची हळवी ओढ म्हणून अनेकदा प्रायोगिक रंगभूमीवर लोकाविष्कार वावरू लागतात, ते या पार्श्वभूमीवर. प्रायोगिक रंगभूमी खेड्यापाड्यांत पोचावी/पोचवावी, अशी स्तुत्य इच्छा बाळगणाऱ्या नाट्यसंस्कारकांना ही प्रक्रिया साधणे जवळजवळ अशक्य असते, तेही याच कारणांमुळे. नेहमीच्या जीवनाचा भाग म्हणून जिथे वासुदेव वावरतात, तिथे वासुदेव फारसे सांगू शकत नाहीत याचे कोडे वाटू नये !

म्हणूनच प्रायोगिक रंगभूमीला लोकाविष्कार लोककला म्हणून वापरणे हिताचे असते. प्रायोगिक रंगभूमीकडे बघताना लोकाविष्कारांना अपभ्रंशित करून सादर केले जाते, मूळ चौकटीबाहेर वेगळे काढल्याने त्यांच्या जीवनशक्तीची क्षती होते इत्यादी आक्षेप चुकीच्या दृष्टिकोनातून घेतले जातात व संदर्भबाह्य ठरतात. प्रायोगिक रंगभूमीला दशावतारी खेळ, ललिताची सोंगे, तमाशाचा वग, दंढार वा यक्षगानासारखे आविष्कार यांना 'वापरावेसे' वाटणार ! प्रायोगिकतेचे तर्कशास्त्र दुसरे काही होऊच देणार नाही ! मुळातले 'लोक' –आविष्कार नागरी प्रक्रियेमुळे लोककला होतात. लोकाविष्कारात कलातत्त्व नसते असे नाही; पण त्या तत्त्वालाच वेगळे काढण्याकडे, त्याला वरच्या पायरीवर बसविण्याचे लोककोटीच्या चौकटीत बसत नाही. या चौकटीबाहेर जाण्याची प्रवृत्ती ज्या आविष्कारात असते ते संधिरेषेवरचे प्रकार होत. (उदा. भजन, तंत्रप्रगत ढोलवादन, लावणीगायन इ.) यांना लोक म्हणणे हे चूक आहे. त्यांना व 'खऱ्या' लोकाविष्कारांना अन्याय करणारे आहे. 'लोक' कोटीत जमा होणारे आविष्कार कोणते, याचा गोंधळ केल्यामुळे अ–नागर ते लोक असा समज होऊ शकतो. तसा तो होऊ नये. चौकटीसकट येणारे लोकाविष्कार आणि रंगभूमी यांचे स्वरूप, कार्यपद्धती, उद्दिष्टे यांत फरक आहे आणि तो राहणार. चौकटीबाहेर काढलेले लोकाविष्कार लोकोद्‌भूत म्हणता येतील; पण ते लोक राहत नाहीत, राहणार नाहीत-मग कोणत्याही उद्दिष्टांनी चौकट मोडण्याची क्रिया प्रेरित झालेली असो. मानवशास्त्रीय अभ्यास, कलानिर्मिती यांसारख्या हेतूंनी चौकट मोडून 'लोक' आविष्कारांना सामोरे जाता येते आणि यावर आक्षेप घेण्याचे कारण नाही. मात्र आपल्या हेतूंशी संलग्न अशी भूमिका व सादरीकरण राहील, इतकी खबरदारी घ्यायला हवी. या संदर्भात मराठी प्रायोगिक रंगभूमीकडे पाहिले असता काय दिसते ?

१) अनेक वेळा प्रायोगिकता लोकाविष्काराकडे वळली ती सैद्धांतिक भारलेपणातून-विशेषत: ब्रेक्टच्या आधाराने. हे आधार नीट विचारातून घेतले गेले नाहीत, हे एक कटु सत्य ! ब्रेक्टने साधलेला परिणाम हा विरोधसंबंधांच्या सादरीकरणातून 'धक्का' देऊन साधलेला परिणाम होता. तेव्हा विरोधसंबंध साधणे महत्त्वाचे. हे संबंध मराठी संस्कृतीत कसे सिद्ध होतात, याचे उत्तर ब्रेक्टचा मागोवा घेऊन कसे मिळणार ? इथे विचार व्हायला हवा तो सांस्कृतिक गतिशास्त्रांच्या आधारे. तो तसा न झाल्याने ब्रेक्टने लोकगीते, सिनेगीते, पटहध्वनी इ. वापरले, म्हणून आपणही वापरले इ. चुका घडल्या. लोकाविष्काराची तत्त्वे उचलणे महत्त्वाचे, लोकाविष्कार नव्हे. हे सूत्र अवलंबिणे अवघड; पण त्याला इलाज नाही. ना अरतीर ना परतीर, अशी स्थिती राहिली.

२) लोकाविष्कार दुसऱ्या प्रकारे प्रायोगिक रंगभूमीवर आले, ते त्यातील कलात्म भागांची निवड करून व त्यांचा मुक्त वापर करून. मुक्त वापरात मुख्य पथ्य असे की, मूळ चौकटीच्या नाळखुणा फार दिसू नयेत. म्हणजे भारलेपणा, सामूहिक भावना

अनुक्रमणिका

असे परिणाम सूचित होण्याइतका घाट उचलावा; पण आंतरिक नातें जोडू नये. हा मार्ग जरा अधिक यशस्वी झाला.

३) लोकाविष्काराची पूर्ण चौकट घ्यावी; पण ती घासून-पुसून घ्यावी, वा त्याच्याशी आधुनिक चौकटींची सांगड घालावी (उदा. वृंदगान, सामूहिक हालचालींचे बंध इत्यादी). हा प्रकार वापरणे जोखमीचे. पण प्रयोग म्हणून करून पाहणें महत्त्वाचे.

४) 'यथाकथन' पद्धतीने ग्रामीण वास्तवावर पूर्ण आविष्कार आधारणे (लोककथा ७८), हा आणखी एक मार्ग. यात परिणाम साधला गेला, पण तो विरोधसंबंधांच्या कार्यामुळे. हे ध्यानात घेतल्यास अशा प्रयत्नांचा पल्ला फार पोचू शकणार नाही, हे लक्षात येईल.

लोकाविष्कार आणि प्रायोगिक रंगभूमीचें नातें कसे राहील, याची भविष्यवाणी वर्तविण्याचा प्रयत्न करणे म्हणजे प्रायोगिक रंगभूमीच्या मूळ सामर्थ्याविषयी अविश्वास दर्शविणे होय ! पण तरीही हौस म्हणून अंदाज बांधायचा प्रयत्न करता येईल. असे वाटते की, अनुभवाचा रासवटपणा, सादरीकरणातला मुक्तपणा आणि नागरी मनाच्या मूळच्या अ-नागरी गाभ्याकडे अबोधमनाची धाव पाहता आता आदिमाकडे प्रवृत्ती वळेल, लोकाविष्कारांच्याही पलीकडे ! शब्दापेक्षा, हावभावादिकांची निःशब्द संदेशपरता, संगीतापेक्षा ध्वनींची सूचकता, संयुक्तिकांच्या बंदिस्तपणापेक्षा 'इर्रॅशनल'ची सार्वत्रिकता आणि मानवी मर्यादांपेक्षा अमानवी शक्तींचे अमर्यादपण यांची ओढ वाढती आहे आणि तिची परिणती आदिमाच्या आकर्षणात व मागोव्यात होऊ शकेल.





अनुक्रमणिका











अनुक्रमणिका



# एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राचा आर्थिक विचार

बा. रं. सुंठणकर

१९ व्या शतकामध्ये महाराष्ट्रात आर्थिक विषयासंबंधी जो विचारविनियम झाला त्याचे एकत्र संकलन करण्याचा हा प्रयत्न आहे. यात त्या शतकात प्रकट झालेल्या विचारावर टीकाटिप्पणी किंवा भाष्य करण्याचा इरादा नाही.

युरोपात आधुनिक काळात जशी भौतिक आणि सामाजिक शास्त्रांची वाढ झाली, तशी आपल्या देशात झाली नाही. येथे इंग्रजांचे राज्य स्थापन झाल्यानंतर इंग्रजी विद्येच्या अनुषंगाने आपला पश्चिमी शास्त्रांशी परिचय झाला व ती आपण शिकू लागलो. आर्थिक विचार किंवा अर्थशास्त्र या विषयालाही हीच गोष्ट लागू पडते. अर्थशास्त्र हे आपण इंग्रजाकडूनच शिकलो. इंग्रजपूर्व काळात हिंदुस्थानचा निर्यात व्यापार मोठा होता. पूर्व आणि पश्चिम दोन्ही दिशांना हिंदी माल मोठ्या प्रमाणावर जात असे. तो व्यापार काबीज करण्याकरिता युरोपीय व्यापारी-कंपन्यांचा हिंदुस्थानात प्रवेश झाला. इतकी आर्थिक घडामोड होत असताना येथे अर्थशास्त्राचा उदय झाला नाही. येथे एखादा अडॅम स्मिथ किंवा रिकॅर्डो जन्माला आला नाही. येथे मोठमोठ्या व्यापारी पेढ्या होत्या. त्यांचे अर्थशास्त्र, व्यापारी देवघेव आणि लेखाशास्त्रा (accountancy) पुरते मर्यादित होते. त्यापेक्षा आर्थिक देवघेवींच्या मूलतत्त्वांचा विचार कोणी केलेला दिसत नाही.

अर्थशास्त्रासंबंधी विचार केला असता असे दिसून येते की, कौटिल्याच्या अर्थशास्त्रानंतर त्या प्रकारचा दुसरा ग्रंथ उपलब्ध नाही. त्या अर्थशास्त्रालासुद्धा खऱ्या अर्थाने अर्थशास्त्र म्हणता येणार नाही. त्यात राजा, त्याचा राज्यकारभार, राजनीति, दंडनीति, संरक्षण, खजिना, कर, खंडणी अशा विषयांसंबंधी विवेचन आहे. त्याला 'पोलिटिकल इकॉनॉमी' म्हणता येणार नाही. अलीकडच्या काळातील उपलब्ध मराठी ग्रंथ म्हणजे १७१६ साली करवीरच्या संभाजी महाराजांनी आपल्या मुलाकरिता तयार करविलेले आज्ञापत्र, "यथाशास्त्र राजनीति" हा होय. त्याचा उद्देश "आयव्ययविचार पाहून जेणेकरून दिवसेंदिवस राज्यात खजिना होय ते करावे" हा होता. "खजिना असल्याने सर्व संकटांचा परिहार होतो" अशी शिकवण त्यात आहे. राज्यात व्यापारवृद्धी करून खजिना वाढवावा यावर त्यात भर आहे. इंग्रजांबद्दल एक सूचक वाक्य त्यात आहे. "हट्टी जात, हाती आलेले स्थळ मेल्यानेही सोडावयाचे नाहीत." असा इंग्रजांचा गुण वर्णिला आहे. त्यानंतरचे दुसरे उपलब्ध वाङ्मय म्हणजे अठराव्या शतकाच्या अखेरीस सवाई माधवराव पेशव्याकरिता तयार करण्यात आलेले एक चोपडे होय. या चोपड्यात महालनिहाय जमाखर्च कसा ठेवावा, खाती कोणत्या प्रकारची असावीत अशा संबंधीच्या सूचना आहेत.

शास्त्र या दृष्टीने अर्थशास्त्राची वाढ आपल्या येथे १९ व्या शतकाच्या शेवटच्या तीन दशकांत झाली. मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेनंतर वाङ्मयाच्या जोडीने इतिहास व अर्थशास्त्र या विषयांचा रीतसर अभ्यास सुरू झाला. त्यामुळे अर्थशास्त्राच्या अभ्यासाला चालना मिळाली. पण तत्पूर्वीही आर्थिक विषयासंबंधी विचार सुरू झाला होता. इंग्रजी राज्याचे दुष्परिणाम इतर प्रांतापेक्षा महाराष्ट्राला फार लवकर जाणवायला लागले. त्या राज्याबद्दल भ्रमनिरास लवकरच झालेला दिसून येतो. येथे मराठ्यांचे स्वतंत्र राज्य होते. मराठ्यांच्या मुलूखगिरीमुळे बाहेरून पैसा येत असे, लष्कर आणि लष्करी पेशा यांमुळे रोजगाराला वाव होता, व्यापारउद्योगांना राजाश्रय होता. मराठी राज्य गेल्यामुळे हे सर्व बंद झाले, उद्योगधंदे बुडाले. बेकारी आणि दारिद्र्य यांची बोच लवकरच







अनुक्रमणिका

जाणवू लागली. देशाचे दारिद्र्य, बेकारी, इंग्रजांनी चालविलेली लूट यांसंबंधी विचार सुरू झाला. या दुःखाला पहिली वाचा भास्कर पांडुरंग याने फोडली. हा दादोबा पांडुरंग यांचा धाकटा भाऊ. इंग्रजी फारसे 'शिकला' नव्हता, पण ती भाषा त्याने चांगली कमावली होती. व्यापारी कंपनीत तो नोकरीवर होता. बाँबे गॅझेट या वृत्तपत्रात १८४१ साली 'ए हिंदू' या टोपण नावाने त्याची ८ पत्रे प्रसिद्ध झाली होती. या पत्रांत त्याने इंग्रजी राज्याचे स्वरूप उघड करून त्याची खूपच निर्भर्त्सना केली आहे. तो म्हणतो : "कायदा आणि न्याय या नावाखाली इंग्रज आम्हाला सर्व बाजूंनी लुटतात. इंग्रजी राज्य हा या देशावरचा भयानक शाप आहे. पेंढारी, रामोशी लुटणार नाहीत इतके लुटून आम्हास इंग्रजांनी भिकेस लावले आहे. त्यांना हाकलून देण्याचा दिवस येईल तो सुदिन होय. इंग्रजांच्या अंमलाखाली देश सुखी आहे असे म्हणणे म्हणजे लुटारूंच्या हाती गाव सोपवून ते सुखासमाधानात आहे असे म्हणण्यासारखे आहे." या पत्रावरून देशाच्या आर्थिक बाजूचा विचार सुरू झाला होता हे दिसून येते. तसेच १८७१ नंतर दादाभाई नौरोजी यांनी आर्थिक शोषणाचा सिद्धांत मांडला, त्याची पूर्वसूचना या पत्रांत सापडते.

त्यानंतर १८४३ ते १८५५ या बारा वर्षांच्या अवधीत आर्थिक विषयावर चार पुस्तके मराठीत प्रसिद्ध झाली.

१. १८४३ साली रामकृष्ण विश्वनाथ यांचा प्रबंध : "हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिती व पुढे तिचा काय परिणाम होणार याविषयी विचार"

२. १८४९ साली लोकहितवादींनी लिहिलेले 'लक्ष्मीज्ञान' हे पुस्तक

३. १८५४ साली हरि केशवजी पाठारे व विश्वनाथ नारायण मंडलिक यांनी सिद्ध केलेले "देशव्यवहारव्यवस्था या शास्त्राची मूलतत्त्वे" हा ग्रंथ. १८५५ साली प्रसिद्ध झालेले कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे "अर्थशास्त्र परिभाषा" हे पुस्तक.

यांपैकी रामकृष्ण विश्वनाथाचा प्रबंध हे स्वतंत्र पुस्तक आहे. बाकीची तीनही अनुवादाच्या स्वरूपाची आहेत. लोकहितवादींचे 'लक्ष्मीज्ञान' हे क्लिफट याच्या 'Elements of Political Economy' या ग्रंथाच्या आधारे लिहिले होते. हरि केशवजी पाठारे यांचे 'देशव्यवहारव्यवस्था' हे पुस्तक मिसेस मार्सेट या लेखिकेचे 'Conversations on Political Economy' व जॉन स्टुअर्ट मिलचे "Principles of Political Economy" या ग्रंथांना अनुसरून संभाषणात्मक लिहिले होते. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे 'अर्थशास्त्र परिभाषा' मिलच्या ग्रंथाच्या एका भागावरून लिहिले होते. दुसऱ्या भागाचे भाषांतर त्यांनी तयार केले होते. पण आता ते उपलब्ध नाही. ही चारही पुस्तके 'Political Economy' या नवीन शास्त्राचा परिचय करून घ्यावा आणि देशाचे दारिद्र्य घालवून तो संपत्तिमान करण्यासाठी या शास्त्राचा अभ्यास आवश्यक आहे या भूमिकेवरून लिहिली गेली होती. विषय नवीन असल्यामुळे तत्संबंधी नवी परिभाषा, नवे शब्द तयार करण्याचे प्रयत्न सुरु झाले. Political Economy ला लक्ष्मीज्ञान, देशव्यवहारव्यवस्था, संपत्तिशास्त्र, अर्थशास्त्र असे प्रतिशब्द वापरलेले दिसतात. अर्थशास्त्र हा शब्द प्रथम कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी उपयोगात आणला आणि तो रूढ झाला. तसेच Wealth याला लक्ष्मी, संपत्ती, धन, द्रव्य, वित्त असे शब्द वापरण्यात येत होते.

रामकृष्ण विश्वनाथ यांच्या प्रबंधाखेरीज त्यांच्याबद्दल काहीही माहिती उपलब्ध नाही. त्यांचे आडनाव कानविंदे असावे असा एक तर्क आहे. त्यांच्या प्रबंधावरून त्यांची स्वतंत्र प्रज्ञा दिसून येते. हा प्रबंध लिहिण्याची प्रेरणा त्यांना अॅडम स्मिथच्या Wealth of Nations या ग्रंथावरून झाली. असे शास्त्र आपल्याकडे नाही, म्हणून आपण लिहीत आहो, हे त्यांनी स्पष्ट केले आहे. थोडक्यात त्यांच्या प्रबंधाचे स्वरूप असे आहे :

श्रम हे मोठे द्रव्यसाधन आहे. द्रव्य साध्य करण्याकरिता मनापासून श्रम केले पाहिजेत. रामकृष्ण विश्वनाथांनीही आर्थिक शोषणाचा (drain) उल्लेख केला असून औद्योगीकरणाची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. भास्कर पांडुरंगाप्रमाणे त्यांचाही भ्रमनिरास झाला होता. तो म्हणतो अनिवार द्रव्य दर वर्षास बाहेर जात आहे. म्हणून



अनुक्रमणिका

लोक भिकेस लागले व दारिद्रय आले. जमाबंदी, शिबंदी, न्यायखाते यांच्या कारभारात मोठे कर लादले आहेत. राज्यात अंदाधुंदी व जुलूम आहे. हिंदुस्थानात तयार होणाऱ्या मालावर जबर कर बसविल्यामुळे येथील धंदे बुडाले. इंग्रजी राज्यात स्थिती सुधारेल हे म्हणणे निरर्थक आहे. आपण स्वावलंबनाचा मार्ग पतकरून दुसऱ्याच्या साहाय्याची गरज न ठेवता यंत्रादि युक्तींचा उपयोग करून कापड, रेशीम, साखर इत्यादी वस्तू येथेच तयार कराव्यात. विलायती मालाची गरज ठेवू नये. येथे तयार झालेला माल बाहेर पाठवावा. येथून गेलेल्या कापसाचे कापड तयार होऊन परत आपल्या देशात येते, त्याची किंमत ५२० पटींनी वाढते असा हिशेब त्यांनी सांगितला. शेअर गोळा करून दहा लाखांची गिरणी काढावी; पृथ्वीच्या पोटातील सोने वगैरे खनिज द्रव्ये काढावीत; सिलिकापासून काच तयार करावी. कारखाने व व्यापार वाढला, की लोक सुखी व धनाढ्य होतील. रामकृष्ण विश्वनाथांनी औद्योगीकरण व व्यापारवृद्धी यांवर भर दिला आहे.

हरि केशवजी यांनी आपल्या पुस्तकात देशव्यवहारशास्त्र म्हणजे Political Economy समजून घेतल्याने आपले दारिद्र्य जाऊन संपत्तीमान होण्याचे साधन प्राप्त होईल यावर भर दिला आहे. "कृषी, शिल्प, व्यापार इत्यादिकांचा आश्रय करून देशव्यवहारशास्त्रातील युक्ती घेवून दारिद्र्याचा उच्छेद करावा म्हणजे ऐश्वर्य संपत्तीसहित या देशी चिरकाल नांदू शकेल" असा विश्वास त्यांनी व्यक्त केला.

कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी आपल्या पुस्तकाला "अर्थशास्त्र परिभाषा" असे नाव देऊन अर्थशास्त्र हा समर्पक शब्द प्रथमच वापरला व तो आता रूढ झाला आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत त्यांनी व्यवहारातील गोष्टींच्या यथार्थ उपपत्ती समजून घेण्याकरिता आणि भ्रामक समजुती घालविण्याकरिता हे शास्त्र शिकणे अवश्य आहे; दारिद्र्याचा नाश करण्याकरिता हे शास्त्र उपयुक्त आहे; इंग्रजांकडून तीव्र शोषण होत आहे, यामुळे आर्थिक विकासाचे मार्ग बंद झाले आहेत; म्हणून आर्थिक विकासाचे शास्त्र आणि तंत्र ही अवगत झाली पाहिजेत असे प्रतिपादन केले आहे.

लोकहितवादींनी आर्थिक विषयावर बरेच लिहिले आहे. 'लक्ष्मीज्ञान' या पुस्तकाशिवाय 'शतपत्रे', 'हिंदुस्थानास दरिद्रच येण्याची कारणे', 'ग्रामरचना', 'निबंधसंग्रह' या त्यांच्या लिखाणातून आर्थिक विचार विखुरलेले आहेत. 'लक्ष्मीज्ञान' या पुस्तकात संपत्तीच्या व्यवहारासंबंधी विवेचन आहे. त्यांचे थोडक्यात प्रतिपादन असे : संपत्तीच्या वृद्धीकरता श्रम केले पाहिजेत. तिची वृद्धी होण्याकरिता ४ गोष्टींची आवश्यकता आहे– १) शहाणपणा, २) प्रत्येकाने वेगळा व्यापार करणे, ३) लक्ष्मीचा संचय करून तिचा योग्य विनियोग करणे, ४) निर्भयपणे प्राप्त लक्ष्मीचा उपभोग घेणे. उद्योगाची वाटणी ही व्यापाराची माता आहे. पैसा हा व्यापाराचा दर्शक आहे. ज्या देशात पैसा फार तो सुखी. सर्व मिळकतीपेक्षा मुख्य मिळकत म्हणजे माणसाचे हातपाय होत. भांडवल व मेहनत यांच्या साहाय्याने लक्ष्मी मिळते. उद्योगाची शिल्लक राहते, त्यावर आणखी उद्योग झाला पाहिजे. आमच्या लोकांनी भांडवल होते तेव्हा उद्योग केला नाही, भांडवल गेले तेव्हा उद्योग सुचून उपयोग नाही. हिंदू लोकांचे शहर म्हणजे आळशी लोकांचा समुदाय होय. श्रीमंत लोकांनी द्रव्य खर्चून मोठाले उद्योग सुरू करून लोकांस मार्ग दाखविला पाहिजे; किंवा सरकारने मार्गदर्शन केले पाहिजे. (लोकहितवादींनी हे लिहिले तेव्हा मुंबईत कापड गिरणीचा जन्म झाला नव्हता; तो पुढे ३–४ वर्षांनी झाला.) चांगली स्थिती येण्यास उद्योग बहुत केले पाहिजेत. उद्योग, विद्या व सुनीती हे लक्ष्मी आणणारे पदार्थ असल्यामुळे त्यांची वृद्धी झाली पाहिजे.

लोकहितवादींनी राजकीय विचाराला आर्थिक तत्त्वाची जोड दिली आहे. दारिद्र्याची मीमांसा करताना त्यांनी आर्थिक शोषणाचे कारण सांगितले आहे. इंग्रज अधिकाऱ्यांचा पगार, इंग्लंडच्या यंत्रोत्पादित मालाचा वाढता खप वगैरे कारणांमुळे संपत्तीचा ओघ त्यांच्या देशाकडे वळला आहे. त्यामुळे बेकारी आली, आमच्या कारागीरांची उपासमार होऊ लागली. भरमसाट शेतसारा, शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा आणि सावकारांचे रक्षण करणारे, कायदे, न्यायदानाची खर्चिक पद्धत

अनुक्रमणिका

या सर्वांमुळे शेतकऱ्यांचे दारिद्र्य वाढले आहे. दारिद्र्यासाठी त्यांनी समाजपद्धतीला जबाबदार धरले आहे. जुन्या चालीरीती, पूर्वग्रह, अविभक्त कुटुंब पद्धती, वंशपरंपरा एकाच धंद्याला चिकटून राहाण्याची सवय, लग्नसमारंभ, धार्मिक विधी इत्यादींकरिता होणारी उधळपट्टी, दागिन्यांची हौस, अज्ञान, आळस, परदेशगमनाला बंदी अशा अनेक कारणांमुळे प्रगतीला अटकाव झाला. या गोष्टी नाहीशा झाल्याशिवाय पाऊल पुढे पडणार नाही. दागदागिन्यांत पैसा अडकून ठेवण्याच्या चालीचा त्यांनी वारंवार निषेध केला आहे. त्यामुळे उद्योग सुरू करण्याला भांडवल मिळत नाही. दारिद्र्यनाशाकरिता लोकहितवादींनी स्वदेशी व औद्योगीकरण हे उपाय सांगितले आहेत. आणि त्यांच्या अनुषंगाने बहिष्काराचा मार्गही सुचविला आहे. आपण स्वदेशी माल तयार करायला शिकावे आणि परदेशी माल न घेता स्वदेशीच माल घ्यावा असे त्यांनी आग्रहाने सांगितले आहे. बाहेर जाणारा संपत्तीचा ओघ थांबवावा, यावर त्यांचा भर होता.

लोकहितवादींचे समकालीन विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीही आर्थिक विचारात भर घातली आहे. याबाबतीतले आपले विचार त्यांनी 'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध' या निबंधात मांडले आहेत. त्यांचा हा निबंध १८६७ साली प्रसिद्ध झाला. योगायोग असा की, कार्ल मार्क्सच्या कॅपिटल ग्रंथाचा पहिला खंड याच वर्षी प्रसिद्ध झाला होता. विष्णुबुवांनी आपल्या निबंधात सामुदायिक जीवनाची–कम्यूनची –कल्पना मांडली आहे. "सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन एक बाग व त्यातून जे जे निघेल ते ते सर्वांचे एक, याप्रमाणे राज्यव्यवस्था असली म्हणजे सर्वांना सर्व उपयोग मिळतात व सर्वांना उत्तम खावयास मिळते व सर्वांना विपुल वस्त्रे व अलंकार, भूषणे मिळतात. ......... म्हणून सर्व लोक पूर्णकाम होतात." गावोगाव धनधान्याची, कापडवस्त्रांची, दागदागिन्यांची वगैरे कोठारे असावीत व त्यांतून ज्यानेत्याने लागेल तसा त्यांचा उपयोग करावा. राजाने निरनिराळ्या धंद्यांची खाती काढावीत आणि त्यांतून तयार झालेल्या वस्तू लोकांना पुरविण्याची व्यवस्था करावी. मुले ५ वर्षांची झाली की, सरकारने ताब्यात घ्यावीत. त्यांना त्यांच्या कुवतीप्रमाणे धंद्याचे शिक्षण द्यावे. सर्वांच्या निर्वाहाची जबाबदारी सरकारने घ्यावी. सर्व लोक सुखी होण्याचा हाच मार्ग आहे, असा निर्वाळा विष्णुबुवा देतात.

यानंतर आपण भारताचे पितामह दादाभाई नौरोजी यांच्याकडे येतो. आर्थिक विचाराला त्यांनी व्यवस्थित स्वरूप दिले. हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा शास्त्रशुद्ध अभ्यास करणारे ते पहिले हिंदी पुढारी होते. परकीय राज्याच्या आर्थिक बाजूचा पद्धतशीर अभ्यास करून त्यांनी इंग्लंडकडून होणाऱ्या हिंदुस्थानच्या आर्थिक पिळवणुकीविरुद्ध हयातभर प्रचार केला. हाताशी फारशी साधनसामग्री उपलब्ध नसता मोठ्या कष्टाने माहिती व आकडेवारी त्यांनी गोळा केली आणि आपला आर्थिक शोषणाचा किंवा खंडणीचा सिद्धांत ( Drain's Theory ) मांडला. १८७० आणि १८७१ या वर्षी 'Wants and Means of India' आणि 'England's Duty to India' हे दोन निबंध ईस्ट इंडिया असोसिएशन समोर त्यांनी वाचले. त्यात त्यांनी आपल्या ड्रेन थिअरीचे सूतोवाच केले होते. त्यानंतर त्यात भर घालत घालत १९०१ साली 'Poverty and Un-British Rule in India' हा ग्रंथराज प्रसिद्ध केला. या त्यांच्या सिद्धांताने हिंदी राष्ट्रवादाचा आर्थिक पाया घातला. हिंदी आर्थिक राष्ट्रवादाचा उगम त्यात सापडतो. दादाभाईंची पद्धती सांख्यिकीय होती. या पद्धतीच्या आधाराने हिंदुस्थानचे दरडोई उत्पन्न ठरविण्याचा पहिला प्रयत्न त्यांनी केला. त्यांनी हिंदी माणसाचे दरडोई उत्पन्न वीस रुपये आहे असे ठरविले. १८७२ साली इंडियन फिनॅन्स कमिटीसमोर ( फॉसेट कमिटी ) साक्ष देताना त्यांनी हिंदुस्थानच्या दारिद्र्याचे मुख्य कारण इंग्लंडकडून होणारे आर्थिक शोषण हे आहे, हे स्पष्टपणे विशद करून सांगितले. हिंदुस्थानच्या बाबतीत 'ड्रेन' चालू आहे हे दादाभाईंपूर्वी शोअर, कॉर्नवॉलिस, मार्टिन मॅरिअर वगैरे इंग्रज अधिकाऱ्यांनी आणि लेखकांनी सांगितले होते. पण दादाभाईंनी आकडेवारी व प्रत्यक्ष वस्तुस्थिती यांच्या आधाराने ते सिद्धांतरूपाने मांडले. दादाभाईंनी 'ड्रेन'ची कारणे सांगितली ती अशी :

**शासकीय कारणे :**

१) इंग्लंडमध्ये द्यावे लागणारे ब्रिटिश अधिकाऱ्यांचे पगार व पेन्शने.

२) हिंदुस्थानात ठेवलेल्या ब्रिटिश फौजेकरिता इंग्लंडच्या युद्ध खात्याला द्यावा लागणारा खर्च.

३) भारत सरकारप्रीत्यर्थ इंग्लंडमध्ये करावा लागणारा खर्च.

**अशासकीय :**

इंग्लंडमधून येथे व्यवसायाकरिता आलेले लोक परत जाताना आपली प्राप्ती इंग्लंडमध्ये घेऊन जातात. त्या संपत्तीमुळे होणारे शोषण. या शोषणामुळे येथे भांडवल संचय होऊ शकत नाही. ब्रिटिश व्यावसायिक येथून जो पैसा नेतात तो पुनः भांडवल म्हणून येथे गुंतवितात. येथील व्यापार आणि महत्त्वाचे उद्योग यांमध्ये त्यांची मक्तेदारी असल्यामुळे शोषणाचे चक्र अव्याहत चालू राहते.

**नैतिक शोषण :**

या प्रत्यक्ष शोषणाबरोबर दादाभाईंनी नैतिक शोषणही सांगितले आहे. ब्रिटिश अधिकाऱ्यांना येथील शासनात जो अनुभव व जे ज्ञान मिळते, ते त्यांच्या बरोबरच जाते. हिंदुस्थान त्याला मुकतो. तसेच हिंदी लोकांना दुय्यम नोकऱ्यांवरच समाधान मानावे लागते. वरच्या जागा मिळत नाहीत. याला दादाभाई नैतिक शोषण म्हणतात.

दादाभाईंच्या अंदाजाप्रमाणे हे आर्थिक शोषण दरसाल तीन ते चार कोटी पौंड (३० ते ४० कोटी रुपये) होत होते. १८१४ पर्यंत ईस्ट इंडिया कंपनीमार्फत १५० कोटी पौंडांची लूट इंग्लंडला मिळाली असा हिशेब त्यांनी केला. त्यांनी हेही दाखवून दिले की, १८३५ ते १८७२ च्या दरम्यान आयात–निर्यात व्यापारात हिंदुस्थानकडून इंग्लंडला ५० कोटी पौंडांची (५०० कोटी रुपये) खंडणी मिळाली. हिंदुस्थान सरकारचा कारभार उधळपट्टीचा आहे, एकूण महसूलापैकी एक तृतीयांश खर्च लष्करावरच होतो, इतर देशांप्रमाणे येथील सर्व महसूल येथेच खर्च न होता त्यांपैकी दरसाल ५ कोटी पौंड महसूलापैकी १ कोटी २० लक्ष पौंड इंग्लंड घेऊन जाते. सरकारच्या हिशेबावर योग्य नियंत्रण व देखरेख नाही. यामुळे लोकांवर जबर करभार पडतो, विशेषतः शेतकरी वर्गावर तो फार पडतो. गरीबीमुळे दुष्काळात हजारो माणसे मृत्युमुखी पडतात. ते स्वतः वेल्बी कमिशनचे सदस्य होते. पण कमिशनसमोर झालेल्या साक्षींनी त्यांचे समाधान झाले नाही म्हणून ते स्वतः साक्षीला उभे राहिले आणि त्यांनी कसून तपासणीला तोंड दिले. आपल्या साक्षीत त्यांनी हिंदुस्थानच्या ऱ्हासाला ब्रिटिश शासनपद्धती कशी जबाबदार आहे, तिने हिंदी लोकांना कसे निःसत्व करून सोडले आहे हे विशद करून सांगितले. हिंदुस्थानातून जो पैसा जातो तो पुनः भांडवलरूपाने येतो. हे दुष्टचक्र चालू असते हा मुद्दा त्यांनी मांडला.

दादाभाईंच्या 'ड्रेन थिअरी'चे स्वरूप सारांशाने असे आहे.

दादाभाईंनी आपला हा सिद्धांत विस्ताराने मांडला. पण हिंदी अर्थशास्त्राचा पाया घालण्याचे श्रेय न्या. मू. म. गो रानडे यांच्याकडे जाते. त्यांना आपण समाजसुधारणेचे पुरस्कर्ते म्हणून अधिक ओळखतो. पण त्यापेक्षाही भारतीय अर्थशास्त्राला त्यांचे देणे हे अधिक मोठे आणि महत्त्वाचे आहे. त्यांनी पाश्चात्त्य अर्थशास्त्र आणि त्यातील विविध संप्रदाय यांचा सखोल अभ्यास केला होता. आणि भारतीय संदर्भात त्यांचा विचार करून त्यांनी आपले सिद्धांत मांडले. १८५२ साली डेक्कन कॉलेजमध्ये त्यांनी हिंदी अर्थशास्त्र (Indian Political Economy) या विषयावर व्याख्यान दिले. ते मूलगामी स्वरूपाचे होते. त्यात त्यांनी अर्थशास्त्र आणि आर्थिक धोरण यांची भारतीय संदर्भात मूलतत्त्वे सांगितली. प्रारंभीच आपली भूमिका स्पष्ट करताना त्यांनी सांगितले की, भौतिकशास्त्राप्रमाणे अर्थशास्त्रादी समाजशास्त्राचे नियम त्रिकालाबाधित नसतात. देशकालपरिस्थित्यनुसार ते बदलतात आणि त्या दृष्टीने त्यांचा विचार केला पाहिजे. त्यानंतर त्यांनी इंग्रज, जर्मन, फ्रेंच, अमेरिकन, इटालियन, आदी पाश्चात्त्य अर्थशास्त्रज्ञांच्या सिद्धांतांचे समालोचन करून असा निष्कर्ष काढला की, अर्थशास्त्राचा विचार मुख्यतः मानवेतिहास दृष्ट्या सर्व परिस्थितीचा प्रत्यक्ष अभ्यास करून सापेक्षतेने आणि समाजहित डोळ्यासमोर ठेवून केला पाहिजे. इंग्रज अर्थशास्त्रज्ञांनी प्रतिपादिलेल्या तत्त्वांचा पुरस्कार



अनुक्रमणिका

आपल्याकडे बिनधोकपणे करता येणे शक्य नाही. परिस्थिती, वेळ, व्यक्तीची कुवत, त्यांच्या आकांक्षा, समाजसंस्था, शासनसंस्था, यांची बंधने यांचा जेथे निकट संबंध येतो तेथे नेहमीच सिद्धांत सारखे लागू पडतात असे नव्हे.

इंग्रज अर्थशास्त्रज्ञांचे काही सिद्धांत त्यांनी अमान्य केले. या शास्त्रज्ञांनी हवामानानुसार जगाची विभागणी केली होती. समशीतोष्ण प्रदेशातील लोकांनी आर्थिक धंदे करावेत. आणि उष्ण प्रदेशातील लोकांनी कृषिव्यवसाय करावा असा जणू त्यांनी निसर्गनियमच ठरवून टाकला होता. रानड्यांनी सांगितले, की हा त्रिकालाबाधित नियम होऊ शकत नाही. या नियमाविरुद्ध त्यांनी जुना इतिहास आणि भविष्यकाळातील संभाव्यता याकडे बोट दाखवून सद्यःकालीन स्थिती ही तात्कालिक आहे, परकीय राज्यकर्त्यांनी स्वतःच्या स्वार्थाकरिता हिंदुस्थानसारखे देश जाणूनबुजून शेतीप्रधान ठेवले, कृषी व्यवस्थेला नवे वळण लावता येते आणि तसे ते लावणे, संपत्तीची न्याय्य विभागणी करणे, श्रीमंतांपासून गरिबांचे रक्षण करणे हे शासनसंस्थेचे कार्य आहे, देश, काल, परिस्थित्यनुसार सरकारचे राष्ट्रीय धोरण ठरले पाहिजे, हिंदुस्थानच्या बाबतीत औद्योगीकरणाच्या प्रक्रियेला सुरुवात करून उद्योगधंद्यांना चालना देणे ही सरकारची जबाबदारी आहे, असे म्हटले. हिंदुस्थानच्या बाबतीत निरंकुश आर्थिक व्यवहाराचे तत्त्व (Laisser faire) त्यांनी अमान्य केले आणि जर्मन शास्त्रज्ञ विशेषतः फ्रीडरिश लिस्ट याची विचारसरणी मान्य करून त्यांनी संरक्षणवादाचा (Protectionism) पुरस्कार केला.

रानड्यांची पद्धत ऐतिहासिक होती. या पद्धतीत भूतकाळाचा विचार करून भविष्याचा अंदाज घ्यावयाचा असतो. अर्थविषयक विज्ञानाचा सापेक्ष दृष्टिकोण स्वीकारून हिंदी अर्थशास्त्र हिंदुस्थानच्या संदर्भातच रचिले पाहिजे. येथे निरंकुश अर्थव्यवहाराचे तत्त्व बाजूला सारावे लागते. युरोपमध्ये या तत्त्वाच्या विरुद्ध प्रतिक्रिया चालू झालेली आहे; तेथे राष्ट्रीय गरजांची काळजी घेणारे माध्यम म्हणून शासनसंस्था ओळखली जाते, हे त्यांनी निदर्शनास आणून दिले.

१८९१ साली भरलेल्या पहिल्या औद्योगिक परिषदेत हाच मुद्दा मांडताना ते म्हणाले : " हिंदुस्थानात नवीन धर्तीचे उद्योग सुरू करण्याला शासनाचे साहाय्य आणि मार्गदर्शन आवश्यक आहे. याकरिता लागणारा खर्च भरून निघेल, इतकेच नव्हे, तर देशाच्या संपत्तीत खूपच भर पडेल." त्याबरोबरच त्यांनी असेही बजावले की, आमचे श्रम आणि निर्धार यांच्या जोरावर अडचणीवर मात करायला आपली तयारी असली पाहिजे.

रानडे यांना नव्या युगाच्या धारणेचे यथार्थ आकलन झाले होते. येऊ घातलेल्या नव्या युगाचे ते उद्गाते होते. त्यांनी औद्योगीकरणाचा आणि नागरीकरणाचा पुरस्कार केला. मोठ्या प्रमाणावर उद्योग सुरू करण्याकरिता जॉइंट स्टॉक तत्त्वावर भांडवल व उद्योग संघटित करणे अवश्यक आहे असे त्यांनी प्रतिपादन केले. हस्तव्यवसायांना ते अनुकूल नव्हते. यंत्रोद्योगापुढे ते टिकाव धरू शकणार नाहीत असे त्यांना वाटे. देशी उद्योगधंदे पडल्यामुळे, कारागीर असहाय्यपणे शेतीकडे वळले, याचा निर्देश करून त्यांनी सांगितले की, "आधुनिक हिंदुस्थानात ग्रामीणीकरण (ruralisation) याचा अर्थ ग्राम्यीकरण (rustication) होणे म्हणजे शक्ती, मती आणि स्वावलंबन यांचा लोप होणे होय. म्हणून ही पुच्छगामी कृती आहे." ना. गोखले यांनी म्हटल्याप्रमाणे रानडे हे नव्या व्यवस्थेचे भाष्यकार होते. नव्या व्यवस्थेचा अर्थ, तीमुळे प्राप्त होणाऱ्या संधी आणि पडणाऱ्या जबाबदाऱ्या यांची जाणीव त्यांनी करून दिली. आम्ही श्रम करण्यात कसूर करणार नसू, तर विपुल फलप्राप्ती होईल हेही त्यांनी सांगितले.

हिंदी अर्थकारण परावलंबी आहे. याचा अर्थ विशद करताना त्यांनी सांगितले की, हे परावलंबित्व म्हणजे येथे कच्चा माल तयार करणे, ब्रिटिश दलालाकरवी ब्रिटिश जहाजातून ब्रिटनमध्ये पोचविणे आणि ब्रिटिश भांडवल आणि कसब यांच्या साहाय्याने पक्का माल तयार करणे आणि तो ब्रिटिश व्यापाऱ्यांमार्फत हिंदुस्थान आणि इतर देशांत ब्रिटिश कंपन्यांकडे पाठवून तेथे तो खपविणे होय. १८९२–९३ सालचे आकडे देऊन त्यांनी दाखवून दिले की, हिंदुस्थानने त्यावर्षी १६ कोटीचा कच्चा माल व ३१ कोटीचा पक्का माल आयात केला आणि ८५

अनुक्रमणिका

कोटीचा कच्चा माल आणि १६ कोटीचा पक्का माल निर्यात केला. म्हणजे ४७ कोटीच्या मोबदल्यात आपण १०१ कोटी बाहेर पाठविले.

दारिद्र्याच्या मूलभूत प्रश्नावर मुख्य उपाय म्हणून औद्योगीकरणावर त्यांनी भर दिला. त्यांच्या योजनेत शासनसंस्था ही स्नेही, तत्त्वज्ञ आणि मार्गदर्शक असली पाहिजे, इतकेच नव्हे, तर ती उपदेशकही (mantor) असणे आवश्यक आहे. त्यांना शेती, उद्योग आणि व्यापार यांच्यात सारखीच प्रगती हवी होती. शेतीव्यवसाय संघटित करून सुधारल्याशिवाय आर्थिक क्रांती होणार नाही, असे सांगून त्यांनी शेती आणि शेतकरी यांच्या साहाय्यासाठी सहकारी संस्था आणि शेतीबँका स्थापन करण्याची सूचना केली होती. औद्योगीकरणाच्या त्यांच्या योजनेत शेतमालावरील संस्करणात्मक उद्योगांचा समावेश होता ( Processing Industries ). शेतीवरचा भार कमी करण्यास ते आवश्यक आहे. त्यांनी जावाच्या ( Culture System ) चे अनुकरण करण्याची शिफारस केली होती. या पद्धतीत बिगर भातशेतीची जमीन ऊस, नीळ, चहा, कोचीनील अशा नगदी पिकांकरता उपयोगात आणावयाची आणि अशी पिके काढण्याची जबाबदारी घेणाऱ्या ठेकेदारांना आगाऊ रकमा देऊन लागवडीसाठी द्यावयाची आणि येणारे पीक युरोपात धाडण्याकरिता ठराविक मुदतीत ठराविक हप्त्यांनी त्यांनी पुरवावयाची. यावर देखरेख सरकारची रहावयाची. या पद्धतीमुळे संस्करणात्मक उद्योगांना मोठ्या प्रमाणात वाव मिळतो.

औद्योगीकरणात लोखंड आणि कोळसा यांना प्राधान्य मिळाले पाहिजे. आणि लोकर, चर्मोद्योग, कागद आणि काच यांना अधिक वाव मिळाला पाहिजे. रानडे केवळ औद्योगीकरणाची दिशा सांगूनच थांबले नाहीत, तर गणेश व्यंकटेश जोशी, दिनशा वाच्छा आणि झवेरीलाल यांच्या सहकार्याने त्यांनी पश्चिम भारताची औद्योगिक परिषद स्थापन केली. तसेच कापड आणि लोकर यांच्या गिरण्या, रे पेपर मिल, भांड्यांचा कारखाना, पुणे डाईंग मिल हे उद्योग संघटित करण्याला त्यांचे उत्तेजन, साहाय्य कारणीभूत होते.

रानड्यांनी स्वदेशीचा जोरदार पुरस्कार केला. १८७२ च्या अखेरीस आणि १८७३ च्या आरंभी त्यांनी पुण्यात स्वदेशीवर दिलेली व्याख्याने फारच परिणामकारक झाली. त्यांच्या या व्याख्यानांनी पुण्यात व महाराष्ट्रात स्वदेशीला जोराने चालना मिळाली. सार्वजनिक 'काकां' सारख्यांनी स्वदेशीचे व्रत घेतले आणि निष्ठेने ते आजन्म पाळले. निश्चयपत्रिकेवर सह्या घेण्याची मोहीम सुरू झाली; स्वदेशी मालाची दुकाने निघाली; लहानसहान उद्योगधंदे चालू करण्याचे प्रयत्न सुरू झाले.

शेतीवरील भार कमी करण्याकरिता त्यांनी लोकसंख्येची अदलाबदल करावी असे सुचविले. शेतीच्या दाट लोकवस्तीच्या प्रदेशातून विरळ लोकवस्तीच्या प्रदेशात माणसे हलवावीत अशी ती सूचना होती. रानड्यांना 'ड्रेन थिअरी' मान्य नव्हती. अगदी प्रारंभी त्यांनी ती स्वीकारली होती. पुढे ती नाकारली. त्यांच्या मते खंडणीच्या प्रश्नावर चर्चा करणे निरर्थक होय. तथाकथित खंडणीचा एक भाग भांडवलावरील व्याजाचा आहे. त्याबद्दल तक्रार करण्याऐवजी कमी व्याजाच्या दरात भांडवल मिळत असल्याबद्दल आपण आभारच मानावयास हवेत. दुसरा भाग लष्करादी खात्याकरिता मालाचा पुरवठा होतो त्याबद्दलचा आहे. यापैकी बहुतेक माल आम्ही उत्पन्न करू शकत नाही. राहिलेल्या मालाबद्दल तक्रार करण्याचे कारण नाही, कारण त्याच्या मोबदल्यात आपणास चीनशी होणाऱ्या अफूच्या व्यापारावरील नफा भरपूर प्रमाणात मिळतो. मग तक्रार का करावी?

१८९१ साली औद्योगिक परिषदेच्या उद्घाटनाच्या वेळी रानड्यांनी परिषदेच्या कार्याकरिता काही तत्त्वे आणि पथ्ये सांगितली :

१ परिषद पक्षातीत आणि गटातीत ठेवावी.

२ अव्यवहार्य उद्दिष्टांच्या मागे लागू नये.

३ देशाचे भयानक दारिद्र्य आणि अनिश्चित शेती यांची जाणीव ठेवून उपायांचा विचार करावा.

४ नवे परिवर्तन घडवून आणण्याकरिता आवश्यक ती मनोवृत्ती निर्माण करावी.

५ शेती व यंत्रोत्पादन यांचा मेळ बसवावा.

६ जॉइंट स्टॉकचे तत्त्व अवलंबावे आणि सहकारी तत्त्वाचा स्वीकार करावा.

अनुक्रमणिका








७ सरकारी साहाय्य गौण मानून स्वप्रयत्नावर भर द्यावा.

न्या. मू. रानडे यांचा अर्थशास्त्राचा अभ्यास त्यांच्या महाविद्यालयीन दिवसापासून सुरू झाला होता आणि हयातभर त्याविषयीचे त्यांचे चिंतन चालू होते. त्यांच्या प्रेरणेने १८७२ साली पुणे सार्वजनिक सभेने महाराष्ट्राच्या काही जिल्ह्यांची पाहणी करून १८७३ मध्ये अहवाल प्रसिद्ध केला. त्या पाहणीवरून शेतकऱ्यांच्या आर्थिक दुरवस्थेला बऱ्याच अंशी सरकारचे महसूलविषयक धोरण कारणीभूत आहे हे उघडकीस आले. दादाभाई नौरोजी, रानडे आणि त्यांचे सहकारी गणेश व्यंकटेश जोशी यांनी देशामध्ये अर्थशास्त्रविषयक जाण निर्माण करण्याचे महत्त्वाचे कार्य केले. त्यांनी भावी काळाकरिता भारतीय अर्थशास्त्राचा आराखडा (print) तयार केला. ही त्रयी, विशेषतः रानडे, हे आर्थिक राष्ट्रवादाचे प्रवक्ते मानले जातात. रानडे आणि जोशी यांच्याबद्दल प्रा. बी. एन्. गांगुली म्हणतात. "They became Publicists with a mission."

मुंबईत गेल्या शतकात न्या. मू. तेलंग, फेरोझशहा मेहता आणि बद्रुद्दीन तय्यबजी ही जशी राजकारणी त्रयी होऊन गेली तशीच मुंबईबाहेर रानडे, ग. व्यं. जोशी आणि ना. गोपाळ कृष्ण गोखले यांची त्रयी होती. या त्रयीचा भारताच्या अर्थशास्त्रीय विचारात मोठा वाटा आहे. रानडे गोखल्यांना गुरुस्थानी होते. जोशी हे रानड्यांचे सहकारी होते. ते पेशाने शिक्षक होते. पण त्यांचा अर्थशास्त्राचा गाढ अभ्यास होता. जोशींचे वैशिष्ट्य म्हणजे आकडेवारीतील त्यांचे नैपुण्य. आकडे जणू त्यांच्याशी बोलतात असे म्हणत असत. त्यांनी अर्थशास्त्रावर विपुल लिखाण केले आहे. शेती, शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा, सरकारी खर्च, नगरपालिकांची आर्थिक स्थिती हे त्यांचे लेखनाचे विषय असत. शेतकऱ्यांची परिस्थिती सुधारायची असेल, तर नुसता सारा कमी करून भागणार नाही, तर शेतीच्या पुनर्वसनाच्या व विकासाच्या योजना हाती घेतल्या पाहिजेत, असे ते प्रतिपादन करीत. या त्रयीपैकी रानड्यांचा प्रभाव अधिक पडत असे हे सांगणे नकोच. ना. गोखल्यांना वेल्बी कमिशनसमोर साक्ष द्यावयाची होती. तिची तयारी करण्याकरिता रानड्यांनी त्यांना जोशींकडे पाठविले आणि जोशींच्या मार्गदर्शनाखाली गोखल्यांनी साक्षीची उत्तम तयारी केली आणि त्यांची साक्ष फार चांगली झाली.

जोशींच्या लिखाणात जशी त्यांची आकड्यावरील हुकमत दिसून येते, तशीच त्यांची सूक्ष्म विश्लेषणाची दृष्टी प्रत्ययास येते. भारतमंत्री हॅमिल्टन हे भारताची अंदाजपत्रके समतोल राखल्याची बढाई मारत असत. भारत सरकारनेच प्रसिद्ध केलेल्या आकड्यांच्या आधाराने जोशी यांनी ही बढाई फोल असल्याचे दाखवून दिले. १८७३ ते १८९६ हा काळ इंग्लंडमध्ये आर्थिक मंदीचा काळ होता. अशा वेळी त्याच्या वसाहती– त्यातही विशेषतः हिंदुस्थान– यांच्यामुळे इंग्लंडला स्वतःला सावरता आले. हिंदी अर्थसंकल्पातील समतोल हिशेब चलाखीने कसा दाखविण्यात येत असे हे त्यांनी उघड करून दाखविले. याच काळात हुंडणावळीच्या बाबतीत हिंदुस्थानचे कसे नुकसान झाले हे आकड्यांनिशी त्यांनी दाखवून दिले. होम चार्जीस आणि इंग्रजसैनिकांचा पगार सोन्याच्या चलनात देण्यात येत असल्यामुळे दरसाल भारताचे १५ कोटींचे नुकसान होत असे. त्यांनी हिंदुस्थानच्या पिळणुकीचे दोन भाग दाखवून दिले. एक–चहाकॉफीचे मळे आणि खाणी ब्रिटिशांच्या मालकीच्या असल्यामुळे त्या उद्योगापासून होणारी प्रत्यक्ष पिळणूक आणि दुसरी–ब्रिटिश मालाच्या आयातीमुळे होणारी अप्रत्यक्ष पिळवणूक. हिंदी अर्थकारणात असमतोल उत्पन्न होतो. त्याची कारणे जोशींनी दिली ती अशी : १) वारंवार पडणारे दुष्काळ आणि पाटबंधाऱ्यांच्या योजनांचा अभाव, २) देशी उद्योगधंद्यांचा नाश, ३) वाढत्या 'होम चार्जीस' ने होणारे आर्थिक शोषण. हिंदुस्थानच्या आर्थिक विकासाकरिता सरकारी साहाय्य आणि लोकांचे स्वावलंबन यांची आवश्यकता त्यांनी प्रतिपादन केली. शेतीतील अर्धबेकारीला 'सक्तीचा आळशीपणा' (forced idleness) असे ते म्हणत. शेतीतील बेकारी आणि अर्धबेकारी यांची संख्या ९ कोटी भरेल आणि त्यामुळे रु. ८२ कोटींचे नुकसान सोसावे लागते असा हिशेब त्यांनी केला होता. जोशींच्या अंदाजाप्रमाणे ४ कोटी २०

अनुक्रमणिका

लाख खेडूत वर्षातील साडेचार महिने पूर्ण बेकार असतात. या बेकारीचा ग्रामीण भागावर अनिष्ट परिणाम होतो. शेतकऱ्यांत अगतिकता आणि नैराश्य पसरते आणि त्यांचा नैतिक ऱ्हास होतो.

राष्ट्रीय कर्जाच्या बाबतीत त्यांचा सरकारवर आक्षेप होता की, ते आर्थिक तत्त्वांचे पालन करीत नाही; जनतेच्या हिताकडे दुर्लक्ष करते आणि कमालीची बेपर्वाईची वृत्ती धारण करते. त्यांनी असे दाखवून दिले की, १८८६ साली एकूण कर्ज २६ कोटी २५ लक्ष पौंड होते आणि त्यावर द्यावे लागणारे व्याज दरसाल १ कोटी १० लक्ष भरावे लागते. कर्जाचे वाढते प्रमाण देशाला धोक्याचे आहे. ते आटोक्यात आणून कर्जाचा भार कमी करण्याकरिता परिणामकारक उपाय योजणे आवश्यक आहे असे त्यांनी प्रतिपादन केले.

मुंबई असेंब्लीतील आपल्या बजेटावरील भाषणात त्यांनी, शेतीबँका काढाव्यात, पाटबंधाऱ्यांच्या योजना अंमलात आणाव्यात, लष्कर आणि रेल्वे यांवरील खर्चात कपात करावी अशा सूचना केल्या होत्या.

ना. गोपाळ कृष्ण गोखले हे दादाभाई नौरोजी, रानडे आणि जोशी यांच्या परंपरेत तयार झाले, आणि ती परंपरा त्यांनी समृद्ध केली. ते हिंदी अर्थशास्त्राचा सामन्याने विचार करीत असत. आणि लोककल्याणाचे साधन या दृष्टीने त्याकडे पहात असत. १८९६ मध्ये त्यांनी वेल्बी कमिशनसमोर दिलेली साक्ष गाजली आणि ते एकदम प्रकाशात आले. त्यांनी आपल्या साक्षीत दुष्काळ, लष्करी खर्च, हिंदुस्थानचा व्यापार, शासकीय कारभार वगैरेबाबतची आकडेवारी आणि कोष्टके सादर करून हिंदुस्थान सरकार कशी उधळपट्टी करते, त्याचा खर्च कसा सारखा वाढत चालला आहे, तो खर्च झेपण्याची लोकांची ताकद कशी कमी होत चालली आहे हे विशद करून सांगितले. सरकारला करवाढ करावी लागते आणि राखीव निधीतून त्याला उचल करावी लागते; तरीही सरकार खर्चाच्या बाबी वाढवीत असते. राज्यकर्त्यांचा परकेपणा, नोकऱ्यांतील परकीयांची मक्तेदारी, पूर्वेकडील देशात गुंतलेले इंग्रजांचे साम्राज्यशाही हितसंबंध या कारणांमुळे प्रजेच्या पैशाचा दुरुपयोग होतो. हिंदुस्थानच्या महसुलातील ३५ टक्के खर्च लष्करावर होतो, तर रशियात २१ टक्के, फ्रान्समध्ये १९ टक्के, जपानमध्ये १६ टक्के आणि इटलीत १३ टक्के खर्च होतो इत्यादी मुद्दे मांडून गोखल्यांनी या बेबंदीला आळा घालण्याकरिता पुढील उपाय सुचविले :

१ कायदे कौन्सिलात बजेटवर मतदान करण्याचा लोकपक्षाला अधिकार असावा; त्यासाठी प्रातिनिधिक राज्यपद्धती सुरू करावी.

२ हिंदुस्थानचे प्रश्न प्रामुख्याने आर्थिक असल्याने व्हॉइसरॉय हा अर्थशास्त्रज्ञ असावा.

३ लष्करी खर्च कमी करावा. हिंदुस्थानचा बिलकूल संबंध नाही अशा बाबींवर हिंदुस्थानचा पैसा खर्च करू नये.

इंग्रजी राज्याचा परिणाम म्हणून हिंदी लोकांच्या सर्व महत्त्वाकांक्षा विरून जातात आणि त्यांचा विकास खुंटत आहे या मुद्द्यावर त्यांनी भर दिला.

१९०२ पासून १९१२ पर्यंत मध्यवर्ती कायदेमंडळात बजेटवर केलेली त्यांची भाषणे महत्त्वाची आहेत. या भाषणात त्यांनी हिंदी अर्थविषयक प्रश्नांचा ऊहापोह केलेला आहे. त्यात लोकवित्त व्यवस्था (Public Finance) हा महत्त्वाचा विषय होता. १९०२ मधील बजेटवरच्या त्यांच्या पहिल्या भाषणात त्यांनी देशाचे दारिद्र्य आणि राष्ट्रीय उत्पन्न यांसंबंधी चर्चा करून शेतीचे उत्पन्न आणि आयात-निर्यात व्यापाराच्या आकडेवारीनिशी दाखवून दिले की, हिंदुस्थान दारिद्र्यात पार बुडाला आहे इतकेच नव्हे, तर दिवसेंदिवस त्याचे दारिद्र्य अधिकाधिक वाढत चालले आहे. हिंदुस्थानची करपद्धती ही परानुगामी (regressive) असून हिंदुस्थानचे शोषण करण्याचे ते एक साधन आहे. त्यामुळे जीवनमान अधिकाधिक खालावत चालले आहे. लष्करी खर्च आणि करांचे ओझे कमी करावे ही त्यांची सततची मागणी होती. उत्पादन वाढविणे आणि भांडवलसंचयाला चालना देणे हा मुळी सरकारी धोरणाचा उद्देशच नाही, अशी टीका त्यांनी केली. आर्थिक सुधारणेकरिता राजकीय सुधारणा होणे आवश्यक आहे यावर त्यांचा भर असे. जबाबदारीचे सरकार असते, तर अर्थसंकल्पाचे स्वरूप निराळे झाले असते असे त्यांनी सांगून टाकले

त्यांची बजेटावरील भाषणे तत्कालीन आर्थिक आणि सामाजिक परिस्थितीवर प्रकाश टाकतात. त्या दृष्टीने त्यांना ऐतिहासिक महत्त्व आहे. शिक्षण, शेती, शेतकऱ्यांची स्थिती, उद्योगधंदे, सरकारी नोकऱ्या, लष्करी खर्च, करव्यवस्था असे विविध विषय त्यांनी हाताळले होते. शिक्षणाच्या प्रसाराला ते सर्वाधिक महत्त्व देत. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचे विधेयक त्यांनी मांडले होते; पण सरकारने ते फेटाळून लावले. शेतकऱ्यांचे दारिद्र्य हा त्यांच्या भाषणाचा नेहमीचा विषय असे. हे दारिद्र्य नाहीसे करण्याकरिता त्यांनी तीन सूचना केल्या: सारा कमी करणे, कर्ज निवारण करण्याचे उपाय योजणे आणि शेतीबँका स्थापणे. आयर्लंडमध्ये ज्याप्रमाणे कायद्याने १० कोटी पौंडांचा निधी स्थापन करून सावकाराकडे केलेल्या शेतकऱ्यांच्या जमिनी परत मिळवून देण्याकरिता सरकारने साहाय्य केले, त्याप्रमाणे हिंदुस्थानात निधी उभा करण्याकरिता शेतीविकासबँका स्थापन कराव्यात, ३½ टक्यांवर व्याज आकारू नये; अशी ५० वर्षांत शेतकरी कर्जमुक्त करण्याची योजना त्यांनी सुचविली. पाटबंधाऱ्यांचाही त्यांनी आग्रह धरला. हुशार हिंदी विद्यार्थ्यांना सुधारलेल्या शेतीचे शिक्षण घेण्यासाठी परदेशी पाठवावे, अशीही त्यांनी सूचना केली होती. औद्योगीकरणावर त्यांनी रानड्यांप्रमाणेच भर दिला होता. दारिद्र्य निवारण्याचा एक उपाय म्हणून तांत्रिक शिक्षण द्यावे, असे त्यांनी सुचविले. त्यांच्या भाषणांचा सरकारवर परिणाम होत असे. मिठावरील कर कमी झाला, स्थानिक स्वराज्य संस्थांना आर्थिक अनुदाने मिळू लागली. अशी याची उदाहरणे सांगता येतील.

जपानची औद्योगिक प्रगती त्यांना आदर्श वाटत होती. जपानने ४० वर्षांत जे केले ते साध्य करायला आपल्याला १०० वर्षे लागतील. त्यासाठी त्यांनी योजनाबद्ध आर्थिक प्रगतीची कल्पना मांडली. १९०३ च्या बजेटवरील त्यांच्या भाषणात लोककल्याणकारी राज्याची कल्पना अंतर्भूत आहे. लोककल्याणाची दृष्टी समोर ठेवून सरकारने आपल्या कार्यपद्धतीत तदनुरूप बदल करावा, अशी त्यांनी सूचना केली. मोफत सक्तीचे शिक्षण, आरोग्याच्या प्राथमिक सुखसोयी, मद्यपानबंदी यांवर त्यांचा भर होता. लोकांच्या भौतिक आणि नैतिक कल्याणासाठी दूरदृष्टीने काळजीपूर्वक योजना आखाव्यात आणि चिकाटीने त्यांचा पाठपुरावा करावा, असे त्यांनी सांगितले.



रानड्यांप्रमाणेच त्यांनी स्वदेशीचा आणि संरक्षणवादाचा पुरस्कार केला. स्वदेशीचा संबंध त्यांनी 'ड्रेन'शी जोडला. ब्रिटनच्या आर्थिक वर्चस्वाने देशाला जो पक्षाघात झाला आहे, त्यावर तोडगा म्हणून ते स्वदेशीचा स्वीकार करीत होते. हातमागाचा व्यवसाय त्यांना उपयुक्त वाटत होता. आर्थिक शोषणात त्यांनी राजकीय शोषण (political drain) आणि आर्थिक शोषण (economic drain) असा भेद केला. आपल्या लखनौच्या भाषणात याचे स्पष्टीकरण करताना त्यांनी सांगितले की, राजकीय कारणांमुळे दरवर्षी २० कोटी रुपयांचे शोषण होते आणि आर्थिक शोषण हे परक्यांचे भांडवल, उद्योग आणि कसब यांमुळे देशी उद्योगधंदे आणि उत्पादक शक्ती खच्ची होतात, यामुळे होते. त्यांना बहिष्काराचे तत्त्व मान्य नव्हते. हे राजकीय लढ्याचे साधन, ही जहालांची भूमिका त्यांना मान्य नव्हती.

संरक्षणवादाचा जोरदार पुरस्कार न्या. मू. तेलंगांनी १८७७ साली मेकॅनिक्स इन्स्टिट्यूटमध्ये "Free Trade and Protection from an Indian Point of View" या त्यांच्या व्याख्यानात केला. Political Economy चे नियम त्रिकालाबाधित नसतात, हे त्यांनी प्रथम सांगितले. अर्थशास्त्राने निर्णय द्यावा असा संरक्षण हा विषय नव्हे, असे प्रतिपादन करून इंग्लंडचे उदाहरण हिंदुस्थानला लागू पडत नाही; तेथे निरंकुश अर्थव्यवहार फायद्याचा ठरतो, तर येथे तो तोट्याचा होतो; सरकारी संरक्षण आणि उत्तेजन यांशिवाय येथे साधनसंपत्तीचा उपयोग करून उद्योगधंद्यांची वाढ करणे हे साध्य होणार नाही असे त्यांनी सांगितले. संरक्षणामुळे एकूण उत्पादन घटेल, उद्योगांची प्रगती होणार नाही, परदेशी व्यापारावर अनिष्ट परिणाम होईल वगैरे आक्षेप त्यांनी अमान्य केले. मुंबई शहरात ज्या काळात संरक्षण होते त्या काळात तेथील आयात व निर्यात व्यापार भरभराटीत होते व मुंबईची वाढ झाली हे त्यांनी आकडेवारीनिशी दाखवून दिले.

हिंदुस्थानात संरक्षण का हवे याची कारणे त्यांनी दिली ती अशी :

१) संरक्षणाशिवाय हा देश निव्वळ शेतीप्रधान होईल. आपली शेती दिवसेंदिवस निकस होत चालली आहे. अशा परिस्थितीत केवळ शेती फायद्याची होणार नाही.

२) संरक्षणाशिवाय उद्योग वाढणार नाहीत. उद्योगाविना भांडवल आणि श्रम रिकामे पडतील.

३) आमचे हस्तोद्योग बुडाले आहेत. यंत्रोत्पादन ही गरज आहे. त्याला संरक्षण आवश्यक आहे.

४) निरंकुश अर्थव्यवहारामुळे मँचेस्टरचे तेवढे हित होईल.

या सर्व कारणांसाठी संरक्षण हे निश्चित फायद्याचे आहे, असे तेलंगानी आग्रहाने प्रतिपादन केले.

सर दिनशा वाच्छा हे आणखी एक अर्थशास्त्रज्ञ होऊन गेले. त्यांनी आर्थिक विषयावर विपुल लेखन केले होते. बँका आणि कापडगिरण्या यांच्याशी त्यांचा निकट संबंध होता. ते फेरोझशहा मेहतांचे उजवे हात होते. त्यांनी वेल्बी कमिशनसमोर साक्ष दिली. तीत त्यांनी हिंदुस्थानचे दारिद्रय कसे वाढत आहे याचे पुरावे सादर केले होते. हुंडणावळ, आगगाड्या, सरकारी कारखाने, कालवे, सरकारी नोकरांचे पगार व कचेऱ्यांचा खर्च यांची आकडेवारी मांडून हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीवर त्यांचा कसा विपरीत परिणाम होतो याचे दिग्दर्शन त्यांनी केले. हुंडणावळीचा भाव वारंवार बदलत असल्यामुळे भारताचे नुकसान होत आले आहे. सरहद्दीवरची संरक्षणव्यवस्था आणि लढाया यांमुळे लष्करी खर्चाचा भार सरकारी तिजोरीवर फार पडतो; या खर्चात युरोपिअनांच्याऐवजी हिंदी माणसे नेमून बचत करावी; अशी सूचना त्यांनी केली. रेल्वे हा त्यांचा खास अभ्यासाचा विषय होता. गेल्या शतकात रेल्वे का पाटबंधारे हा वादाचा विषय होता; पण इंग्लंडला कच्चा माल– विशेषत: कापूस– पुरविण्याच्या उद्देशाने सरकारने रेल्वेची बाजू घेतली आणि पाटबंधारे मागे पडले. वाच्छा पाटबंधाऱ्यांची तरफदारी करीत होते. रेल्वेपेक्षा पाटबंधारे अधिक फायद्याचे; म्हणून त्यांना प्राधान्य द्यावे, असे त्यांचे प्रतिपादन होते. आगगाड्यांमध्ये दहा वर्षांत १४ कोटी रुपयांचा तोटा झाला. रेल्वेत गुंतलेल्या भांडवलावर ४ टक्के नफा सुटतो, तर पाटबंधाऱ्यांवर ६$\frac{3}{4}$ टक्के सुटतो असा हिशेब त्यांनी मांडला. तसेच रेल्वेमुळे आयातीपेक्षा निर्यात, खूपच वाढते; हे कर्जबाजारीपणाचे लक्षण आहे असे त्यांना वाटे. रेल्वेत १९०१ पर्यंत दरवर्षी १ टक्का तोटा आला आणि १८९६ पर्यंत एकूण ५८ कोटी ८४ लक्ष रुपयांचा तोटा सोसावा लागला असे त्यांनी निदर्शनास आणले. सरकारने राखीव निधी उभारून २५ वर्षांत सर्व रेल्वे ताब्यात घेण्याचे धोरण ठेवले असते, तर देशाचे अधिक हित झाले असते. असा निधी न उभारता कर वाढवून तोटा भरून काढला म्हणून त्यांनी सरकारला दोष दिला. वाच्छांनीही शेतकऱ्यांचे कर्जनिवारण व कर्जपुरवठा यांसाठी शेतीबँकांचा पुरस्कार केला होता.

वाच्छा अनेक वर्षे अखिल भारतीय काँग्रेसचे सेक्रेटरी होते. काँग्रेसच्या अधिवेशनांत ते आर्थिक ठरावावर बोलत असत. हिंदुस्थानचे दारिद्रय आणि भरमसाट लष्करी खर्च याबद्दल ते सरकारला दोषी धरत असत. १८९२च्या अधिवेशनातील भाषणात त्यांनी रुप्याचे चलन बंद केल्यामुळे हिंदी अर्थकारणावर कसा वाईट परिणाम झाला आहे आणि सुवर्णमानामुळे हिंदी जनतेचे हित कसे धोक्यात आले आहे हे सांगून सरकारवर राज्यनियंत्रित अनैतिकतेचा (State regulated immorality) आरोप केला.

काँग्रेसच्या दुसऱ्या अधिवेशनात दादाभाईंच्या खंडणीच्या सिद्धांताच्या आधारावर त्यांनी सरकारवर हल्ला चढविला. ते म्हणाले : " हिंदुस्थानातील रयतेची स्थिती १८४८ नंतर सतत खालावत चालली आहे. ४ कोटी लोकांना धड एक वेळचे अन्नही मिळत नाही. याचे मुख्य कारण म्हणजे ग्रेट ब्रिटनला द्यावी लागणारी खंडणी. या खंडणीमुळे त्या अतिदूरच्या बेटांची अगणित संपत्ती फुगत चालली आहे आणि कोणत्याही स्वरूपात तिचा मोबदला या देशाला मिळत नाही."

सरकारच्या अर्थव्यवस्थेवर नियंत्रण नाही. असे नियंत्रण असल्याशिवाय देशाचे अर्थकारण सुधारणार नाही. त्यासाठी बजेटवर मतदान करण्याचा अधिकार लोकप्रतिनिधींना मिळाला पाहिजे. यास्तव प्रातिनिधिक पद्धती हवी असे त्यांनी प्रतिपादन केले.

अनुक्रमणिका

आतापर्यंत आर्थिक विचार सांगितला हा नेमस्त पक्षाचा होता. त्या काळी ते मवाळ म्हणून ओळखले जात असत. त्यांच्याविरुद्ध जहाल पक्ष होता. त्याचे अध्वर्यू लो. टिळक होते. जहाल-मवाळांत राजकीय मतभेद असले, तरी भारतीय अर्थकारणाच्या बाबतीत मतभेदाला फारसा वाव नव्हता. देशाचा मूलभूत प्रश्न जो दारिद्र्याचा, त्याचा विचार करणे दोघांनाही भाग होते. राजकीय प्रश्नाला प्राधान्य होते; तरी आर्थिक प्रश्न गौण समजून त्याकडे दुर्लक्ष होत होते असे नव्हे. साम्राज्यशाहीच्या पिळवणुकीच्या धोरणामुळे त्यांना अर्थकारणाचा विचार राजकीय संदर्भात करणे क्रमप्राप्त होते. मवाळांनी आर्थिक प्रश्नाचा अधिक खोलवर अभ्यास केला होता. रानडे–गोखल्यांप्रमाणे टिळक–आगरकरांनीही आर्थिक विषयावर लिखाण केले होते. या दोघांत भेद होता, तो कोणत्या गोष्टीवर अधिक भर द्यावयाचा या बाबतीत. टिळक आपल्या जहाल राजकारणाच्या प्रचाराकरिता अर्थकारणाचा उपयोग करीत होते. त्यांचा रोख इंग्रज राज्याचे दोष दाखवून असंतोष निर्माण करणे व स्वराज्याची भूमिका तयार करणे हा होता. अर्थकारण हेही त्यांनी आपल्या लढ्याचे एक साधन मानले. टिळकांनी रानड्यांप्रमाणे अर्थशास्त्राचा खोल अभ्यास केला नव्हता आणि रानड्यांप्रमाणे आर्थिक विचाराला नवे वळण लावण्याचे कार्य त्यांनी केले नाही, तरी त्यांना अर्थशास्त्राची चांगलीच जाण होती, हे त्यांच्या आर्थिक विषयावरील लिखाणावरून दिसून येते. १९०५–६ पर्यंत केसरीत ते आर्थिक विषयावर लिहीत असत. पण पुढे आणि विशेषतः वंगभंगाच्या चळवळीनंतर अर्थशास्त्राकडे लक्ष देण्यास त्यांना सवड मिळाली नसावी. पण त्यांनी आर्थिक विषयांवर जे लिहिले ते अर्थपूर्ण होते. ब्रिटिश साम्राज्यशाही आणि हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिती यांचे त्यांना पूर्णपणे आकलन झाले होते; आणि लोकांना समजेल अशा सोप्या भाषेत त्यांनी त्याबाबतचे विवेचन केले आहे. हिंदुस्थानची आर्थिक दुरवस्था आणि दारिद्र्य यांकरिता त्यांनी इंग्रज राज्यकर्त्यांना दोषी धरले आहे. आशियाई राष्ट्रे मागासलेली राहिली, याचे कारण पाश्चात्त्यांची साम्राज्यतृष्णा, हे त्यांनी सांगितले. इंग्रजी राज्यामुळे लोकांच्या कर्तृत्वाला कोणताही व्यवसाय करायला वाव राहिला नाही, हे त्यांनी 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' या लेखमालेत स्पष्ट केले आहे. लोकसंख्यावाढीच्या प्रश्नाचे महत्त्व जे स्वातंत्र्योत्तर काळात आमच्या पुढाऱ्यांना समजले नव्हते, ते रानडे-गोखले-टिळक-आगरकर यांना जाणवले होते. लोकसंख्यावाढीच्या संकटाबद्दल या सगळ्यांनी इशारा दिला होता. टिळकांनी केसरीमध्ये दुष्काळ आणि जमीन महसूल या प्रश्नावर प्रसंगोपात्त खूपच लिहिले होते. त्यांनी सरकारला बजावले की, रयतेने दुष्काळाला समर्थपणे तोंड द्यावे असे वाटत असेल तर, 'लष्करी खर्च कमी करा, हिंदुस्थानातून इंग्लंडकडे चाललेल्या संपत्तीचा ओघ कमी करा, जमिनीचा सारा हलका करून रयतेची स्थिती सुधारा'. सरकारच्या उधळपट्टीच्या कारभारावर केसरीमध्ये त्यांनी खूपच कोरडे ओढले होते. मुंबई कौन्सिलमधील १८९५ च्या बजेटवरील भाषणात त्यांनी विविध खात्यांवरील खर्च वाढत आहेत; पण त्याबरोबर लोकांच्या परिस्थितीत सुधारणा होत नाही अशी टीका केली. तसेच १८९६ साली बजेटवर बोलतांना मुंबई इलाख्याचे बजेट हे मृतवत (dead budget) आहे. ते मध्यवर्ती सरकारकडून येत असल्यामुळे ते मुंबई सरकार आणि हिंदुस्थान सरकार यांच्या हिशेबाचा खातेउतारा असे त्याचे स्वरूप आहे असे म्हटले होते. शेतसाऱ्यात सतत वाढ होत जाते. म्हणून कायमधाऱ्याची पद्धत सुरू करावी अशी त्या काळच्या इतर पुढाऱ्यांप्रमाणे त्यांनीही मागणी केली होती. शेतकऱ्यांच्या विपन्नावस्थेचे मूळ फार खोल आहे आणि एकंदर परिस्थितीवर सावकारी नियंत्रणासारखे वरवरचे उपाय उपयोगी पडणारे नाहीत असा इशारा त्यांनी दिला. अज्ञान, उधळेपणा, दर पिढीस होणारी जमिनीची वाटणी इत्यादी कारणांमुळे शेतकरी दरिद्री झाला आहे. "शेतकरी लोक दंगा करण्यास प्रवृत्त होण्याचे मुख्य कारण दारिद्र्य होय. कुटुंब वाढले, दुसरा व्यापारधंदा नाहीसा झाला, जमिनीस कस नसल्यामुळे ती नीरस होत चालली, आणि पाऊसही वेळच्यावेळी पडत नाहीसा झाला, अशा स्थितीत कोणत्याही राष्ट्रातील शेतकरी दारिद्र्यात आणि कर्जात बुडालेले असावयाचे." असे सांगून नुसत्या १८७९ च्या ॲक्टने शेतकऱ्यांच्या दारिद्र्याचे कारण कधीही

समूळ नाहीसे होणार नाही असे मत त्यांनी व्यक्त केले. शेतकऱ्याची परिस्थिती सुधारावयाची असेल, तर त्याला शिक्षणाने शहाणे केले पाहिजे आणि रोजगाराची साधने त्याला मिळवून दिली पाहिजेत. ही जबाबदारी सरकारची आहे आणि सरकार ती पार पाडत नाही असा त्यांचा दोषारोप होता. १९०३ साली लिहिलेल्या 'शेतकऱ्यांच्या परस्पर साहाय्यकारी पेढ्या' या लेखात तत्संबंधीच्या विधेयकावर चर्चा करताना त्यांनी लिहिले की, "सरकारचा ओढा परस्पर भागविण्याकडे असल्यामुळे हे बील बाहेर पडले आहे. पण बाहेरून भांडवल पुरविल्याखेरीज या पेढ्या केवळ परस्पर साहाय्याने यशस्वी होणार नाहीत." असा इशारा कायद्याच्या जन्मकाळीच देण्यात त्यांची दूरदृष्टी प्रत्ययास येते.

शेतकऱ्यांच्या प्रश्नाप्रमाणेच विणकऱ्यांच्या प्रश्नांतही टिळकांनी लक्ष घातले होते. १८९६ च्या दुष्काळात सोलापूरच्या विणकरांची स्थिती अत्यंत हलाखीची झाली होती. सरकार त्यांना खडी फोडण्याच्या दुष्काळी कामावर पाठवीत होते आणि त्यांना मिळणारे वेतन अगदीच अपुरे होते. 'फेमीन कोडा'मध्ये अशा कारागीरांना भांडवल, सूत, हातमागाची साधने वगैरे पुरवावीत असा नियम घालून दिला होता. टिळकांनी 'फेमीन कोडा'प्रमाणे विणकरांना तरतुदी पुरवाव्यात अशी सूचना अधिकाऱ्यांना केली. पण त्यांनी ते मनावर घेतले नाही. तेव्हा टिळकांनी सोलापूरच्या श्रीमंत व्यापाऱ्यांकडून निधी गोळा करून त्याच्या साहाय्याने सहकारी तत्त्वावर विणकरांना सूत पुरविण्याची व्यवस्था केली आणि त्याबरोबरच विणकरांनी तयार केलेल्या कापडाच्या विक्रीची हमी त्यांना देण्यात आली. त्यातूनच विणकरांचा संघ निर्माण झाला आणि अद्यापही त्याचे कार्य चालू आहे. टिळकांनी केलेल्या या व्यवस्थेमुळे १९०० सालचा दुष्काळ विणकरांना जाणवला नाही. विणकरांना काम भरपूर मिळून त्यांची स्थिती सुधारली.

टिळकांनी हुंडणावळीच्या प्रश्नाचा चांगला अभ्यास केला होता. जर्मनीने चांदीचे चलन बंद केल्यामुळे १८७३ नंतर रुपयाची किंमत घसरत घसरत २० वर्षांनी ती २ शिलिंगावरून एक शिलिंग चार पेन्स इतकी खाली आली. त्यामुळे हिंदुस्थानचे फार नुकसान होऊ लागले. त्यातच १८७६-७७ च्या दुष्काळाची भर पडली; अफगाणिस्थान आणि ब्रह्मदेश यांची युद्धे सरकारने ओढवून घेतली. त्याचा परिणाम सरकारी तिजोरीवर फार ताण पडण्यात झाला. 'होम चार्जीस' आणि कर्जही वाढू लागली आणि हुंडणावळीच्या दराच्या अनिश्चिततेमुळे तुटीचा अंदाज करणेही कठीण होऊन बसले. या प्रश्नाचा विचार करून अहवाल सादर करण्यासाठी ब्रिटिश सरकारने 'हर्शेल कमिटी' नेमली. तिचा रिपोर्ट १८९३ मध्ये बाहेर पडला.

या हुंडणावळीच्या प्रश्नाला अनुसरून ३० ऑगस्ट १८९२ ते ४ जुलै १८९३ च्या दरम्यान टिळकांनी केसरीमध्ये एकूण ७ लेख लिहिले. ५ लेख सोन्यारुप्याचे नाणे यावर, एक सोन्यारुप्याची लढाई आणि शवटचा चांदी, रुपये आणि पौंड. शेवटचा लेख त्यांनी हर्शेल कमिटीचा अहवाल बाहेर पडल्यानंतर लिहिला होता. अगदी सोप्या भाषेत हुंडणावळीचा प्रश्न त्यांनी समजावून दिला आहे. १८७२ ते १८९२ या वीस वर्षात हुंडणावळीखातर सरकारी तिजोरीतून ६० कोटी रुपये जादा खर्च पडले. याचा निर्देश करून सोन्यारुप्याच्या चलनासंबंधी त्यांनी विस्ताराने चर्चा केली आहे. रुपयाची किंमत कमी झाली; पण होमचार्जीस आणि ब्रिटिश नोकरांचे पगार हे पौंडाच्या दरात देण्यात येत होते. त्यामुळे हिंदुस्थानचे कसे नुकसान होते हे दर्शविताना ज्या असिस्टंट कलेक्टराला पूर्वी रु. १००० मिळत त्याला १४२५ रुपये द्यावे लागत होते. म्हणजे त्याचा पगार ४३.२ टक्याने वाढला हे उदाहरण त्यांनी दिले. तसेच शेतकऱ्याचे उदाहरण देऊन त्यांनी दाखवून दिले, की पूर्वी शेतकऱ्याला रु. १०० सारा देण्याकरिता रु. १०० चे धान्य विकावे लागे, ते त्याला १४३ रुपयांचे धान्य विकणे भाग पडत होते. म्हणजे ४३ टक्के त्याला जादा द्यावे लागत होते. रुपयाची पौंडाशी गाठ घातल्यामुळे सरकारचा जो फाजील खर्च वाढला तो भरून काढण्याकरिता मिठाच्या करासारखा त्रासदायक करांचा बोजा वाढविणे सरकारला भाग पडले. यावर उपाय म्हणून टिळकांनी सोन्यारुप्याच्या किमतीचे प्रमाण ठरवून टाकावे, म्हणजच रुपयाची पौंडाने कायमची किंमत ठरवून टाकावी असे सुचविले.








हर्शेल कमिटीच्या अहवालाच्या आधाराने सरकारने जो कायदा केला त्यानुसार रुपयाची किंमत सोन्याच्या दराने करावयाची आणि त्यास विलायती नाणे भावासाठी घ्यावयाचे असे ठरले. त्या वेळी सरकारने रुपयाचा १६ पेन्स भाव ठरविला. टिळकांनी रुपयाचा हा भाव सरकारने केवळ अधिकाराच्या जोरावर ठरविला अशी टीका करून त्या कायद्याचे काय परिणाम होतील याचे दिग्दर्शन करताना पुढील मुद्दे सांगितले :

१) देशात रुपयाची टंचाई निर्माण होईल.

२) शेतकऱ्यांच्या मालाची किंमत कमी आल्यामुळे त्यांना बूड सोसावी लागेल.

३) भारताच्या चीनशी होणाऱ्या व्यापाराला धक्का पोचेल.

४) लोकांनी साठविलेल्या सोन्यारुप्याची किंमत एकदम कमी होईल.

५) देशी संस्थानात निरनिराळी नाणी चालू आहेत. त्यांना हा कायदा लागू नसल्यामुळे त्यांचे फार नुकसान होणार आहे.

६) खोटी नाणी पाडण्याचा धोका निर्माण होईल.

हर्शेल कमिटीच्या रिपोर्टबद्दल त्यांनी म्हटले आहे की, "हिंदुस्थान सरकारास अर्थातच आपल्या खजिन्यातील तूट गरीब हिंदी लोकांच्या डोक्यावर हवे तसे कराचे ओझे बसवून भरून काढण्यास हर्शेल कमिटीने मुखत्यारी दिली यात काहीच आश्चर्य नाही."

टिळकांनी स्वदेशी आणि बहिष्कार यांचा हिरिरीने पुरस्कार केला. बहिष्कार हा स्वदेशीला पूरक होता. या दोहोंचा त्यांनी स्वराज्याच्या लढ्याचे साधन म्हणून उपयोग केला. त्यांनी स्वदेशीचे एक तत्वज्ञान बनविले. स्वदेशी म्हणजे राष्ट्रीयत्व आणि स्वदेशाभिमान यांचा संयोग होय. राष्ट्रीय चैतन्याची ती प्रतिष्ठापना होय. स्वदेशी हा स्वावलंबनाचा संदेश होता. स्वदेशीचा प्रचार त्यांनी लोकजागृतीच्या कारणी लावला. आर्थिक स्वातंत्र्याप्रीत्यर्थच्या लढ्याचे ते एक साधन होते. स्वदेशी हे औद्योगीकरणाचे समीकरण होते. नष्ट झालेल्या उद्योगधंद्यांचे पुनरुज्जीवन, चालू उद्योगांना बळकटी आणणे आणि आधुनिक विज्ञान आणि शोध यांचा उपयोग करून नवे उद्योग सुरू करणे ही स्वदेशीची अंगे होती. आर्थिक शोषणापासून देश वाचविणे हाही स्वदेशीचा उद्देश होता. पुण्यात जेव्हा पहिली कापड गिरणी निघाली तेव्हा त्यांनी 'पुण्यातील पहिली चिमणी' म्हणून तिचे स्वागत केले. औद्योगिक उपक्रम म्हणून स्वतःही त्यांनी लातूर येथे एक जिनिंग फॅक्टरी भागीदारीत चालविली होती. पैसा फंडाकरिता प्रचार करून आणि निधी जमवून तळेगाव येथे काच कारखाना काढण्यात त्यांचा प्रमुख भाग होता.

लो. टिळकांच्या दूरदृष्टीचे उत्तम उदाहरण म्हणजे महाराष्ट्रात साखर कारखाने काढण्याची कल्पना त्यांनी १९०६ साली सूचित केली होती. जॉर्डन नावाच्या एका साखर तज्ञाने 'मराठा' पत्रामध्ये मॉरिशसमधील साखरेच्या उद्योगासंबंधी एक माहितीपूर्ण लेख लिहिला होता. त्या लेखाच्या आधारे टिळकांनी १७ जुलै १९०६ च्या केसरीत लेख लिहून महाराष्ट्रात मॉरिशसप्रमाणे साखरेचे ८० कारखाने निघण्याची शक्यता आकडेवारीनिशी दाखवून दिली होती. त्यांनी लिहिले होते : "महाराष्ट्रात उसाची लागवड वाढविण्यास एवढी जागा आहे की, मॉरिशस बेटातून येणारी सर्व साखर आम्ही उत्पन्न करू; एवढेच नव्हे तर, आम्हास लागणारा गूळही उत्पन्न करून परदेशास नाही तर हिंदुस्थानच्या सर्व भागात तरी चांगल्या साखरेचा पुरवठा करू." महाराष्ट्रात पिकणाऱ्या उसावर दर एकरी ७५० रुपये किंमतीची ३½ टन साखर उत्पन्न करता येणे शक्य आहे. साखरेचा लहान कारखाना काढण्यास पावणेदोन लाख रुपये लागतील आणि त्या भांडवलावर शेकडा २८, निदान १४ टक्के नफा मिळविता येईल. आणि मोठा कारखाना काढला तर १ लाख रुपये अधिक लागतील असा हिशेब त्यांनी मांडला होता. इतकेच नव्हे तर, साखर केल्यानंतर शिल्लक राहणाऱ्या राबापासून दारू करण्याची कल्पनाही त्यांनी मांडली होती. वास्तविक असे कारखाने काढण्यास साहाय्य करणे हे सरकारचे कर्तव्य आहे. पण सरकार ते पार पाडीत नाही. यासाठी सरकारला त्यांनी दोष दिला.

साखरेच्या कारखान्याच्या या प्रश्नाचा पाठपुरावा टिळकांनी २२ मार्च १९०८ रोजी रा. ब.

अनुक्रमणिका

गणेश व्यंकटेश जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या 'पुणे जिल्हा सभेच्या बैठकीत साखरेचे कारखाने काढण्यासंबंधीचा ठराव मांडून केला. या ठरावान्वये महाराष्ट्रात साखर कारखाने सुरू करण्याचा सांगोपांग विचार करून अहवाल सादर करण्याकरिता एक समिती नेमण्यात आली होती. ठरावावर भाषण करताना टिळक म्हणाले : "हिंदुस्थानात परदेशाहून तीन कोट रुपयांची साखर येते. इतकी साखर परदेशातून का यावी ? आमच्या इकडचा ऊस मॉरिशसच्या उसासारखा– किंबहुना सरस– असता इकडे साखर तयार करण्याचे कारखाने निघून स्वदेशी का तयार होत नाही ? आपण कापूस उत्पन्न करावा आणि कापड तयार करू नये, आपण गूळ तयार करावा पण साखर करू नये, हा असाच क्रम सर्व बाबतींत का दिसून येतो ? सध्या काकवी, काकवीची 'रम' व साखर सारेच परदेशातून इकडे येत आहे. या गोष्टीचा विचार करून व जरूर लागल्यास हे काम शेवटपर्यंत नेऊन ते यशस्वी करावे, अशी सूचना आहे. एका मॉरिशस बेटात ८० कारखाने आहेत. येथे निदान ४०–५० तरी होतील, तर आपला काही कोटींचा फायदा होणार आहे. या ठरावाप्रमाणे नेमण्यात येणारी कमिटी उसाचे कारखाने कसे काढता येतील, ते काढण्यासंबंधी अडचणी काय आहेत व त्या कशा दूर होतील यासंबंधाने चौकशी करील आणि त्याबद्दल शेतकरी, सावकार, शेतकीखाते व सरकारी अधिकारी यांजबरोबर पत्रव्यवहार करून जरूर ती व्यवस्था करील."

यावरून टिळकांच्या मनांत साखर कारखान्यांचा उपक्रम सुरू करून त्यांना चालना देण्याचा होता हे स्पष्ट दिसून येते. पण पुढे टिळकांना सरकारने मंडालेला ६ वर्षे डांबून ठेवल्याने टिळकांचा बेत मागे पडला. ते सुटून आल्यानंतर युद्धपरिस्थितीमुळे राजकारणाला निराळे वळण लागले. पण साखर कारखान्यांचे टिळकांचे भाकीत अर्धशतकानंतर खरे ठरले; इतकेच नव्हे तर साखर कारखान्यांची प्रभावी लॉबी महाराष्ट्रात स्थापन झाली आहे.

आगरकरांनीही आर्थिक विषयावर विचार मांडले आहेत. त्यांच्यावर मिल आणि स्पेन्सर यांची अधिक छाप पडली होती. त्यांनीही शोषणाच्या सिद्धांताचा आधार घेतला होता. हिंदुस्थानचे दारिद्र्य आणि आर्थिक दास्य यांवर त्यांनी कडक शब्दांत लिहिले आहे. "इंग्रजी राज्याची उलट बाजू अथवा आमचे घोर दारिद्र्य", "हिंदुस्थानला क्षय लागला", "वाचाल तर चकित व्हाल", "घ्या, पण काही धरबंद असू द्या," 'हिंदुस्थानच्या अन्नान्न दशेचे परिणाम,' 'हिंदुस्थानची तिजोरी आणि घाटत असलेले अन्याय,' हे त्यांच्या लेखाचे मथळेच बोलके आहेत. डिग्बीसारख्यांचा आधार घेऊन दारिद्र्य कसे वाढत आहे याचे विदारक चित्र त्यांनी उभे केले. "एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत कंगालतेवाचून काहीही दृष्टोत्पत्तीस येत नाही" असे थोडक्यात त्यांनी दारिद्र्याचे वर्णन केले. सरकारला त्यांनी त्वेषाने बजावले की, "आम्ही पाहिजे तसा खर्च करून तो भागविण्यासाठी पाहिजे तसले कर बसवू असेही तुम्ही म्हणाल, तर मात्र आम्ही तुमच्याशी एकसारखे भांडल्याशिवाय व आमच्या आरोळ्यांनी तुमच्या कानाची रंध्रे भरून टाकून तुमची डोकी फिरवून सोडल्याशिवाय राहणार नाही."

अर्थशास्त्राला त्यांनी संपत्‌शास्त्र हा शब्द उपयोजिला होता. 'तीन अर्थशास्त्रे' या लेखात त्यांनी अर्थशास्त्राचे तीन भाग, अनुक्रमे औपपत्तिक, प्रयोज्य आणि भ्रामक अर्थशास्त्र, असे सांगितले. संपत्तीची उत्पत्ती, वाटणी आणि अदलाबदल यांपैकी कोणत्याही गोष्टीत सरकारने हात घालू नये हे औपपत्तिक अर्थशास्त्र. याचे पालन सरकार आपल्या फायद्याकरिता तेवढेच करते. सरकारने व लोकांनी वाजवी उत्तेजन देऊन इतर देशांशी प्रतिस्पर्धा करण्याचे सामर्थ्य आणावे आणि मग हवा तसा निष्प्रतिबंधक व्यापार सुरू करावा हे प्रयोज्य अर्थशास्त्र. देशी मालाशिवाय दुसरा माल वापरूच नये याला त्यांनी भ्रामक अर्थ म्हटले आहे. म. गांधींनी चरख्यावर दिलेल्या सर्वस्वी भराला आगरकरांनी कदाचित भ्रामक अर्थशास्त्र म्हटले असते. आगरकरांचा भर अर्थात प्रयोज्य अर्थशास्त्रावर होता हे सांगणे नकोच. औपपत्तिक अर्थशास्त्र अमान्य करण्यात त्यांनी संरक्षणवादाचा पुरस्कार केला. प्रयोज्य अर्थशास्त्राला अनुसरून त्यांनी मोठे भांडवल उभे करून मोठ्या प्रमाणावर यंत्रोद्योग सुरू करावेत,





दागदागिने व बँका यांत पैसा न अडकविता तो व्यापारात घालावा, कारागीरांना आर्थिक साहाय्य द्यावे, जागोजाग यंत्रालये स्थापन करावीत, धंदे-शिक्षण द्यावे असे मार्ग त्यांनी सुचविले होते.

समाजोत्कर्षाचा मुख्य घटक म्हणून व्यापारवृद्धी-वर त्यांनी भर दिला. त्यांनी सुशिक्षितांना बजावले की, "विद्यार्जनाने विकसित झालेली मने स्वतंत्र धंदे स्थापण्याकडे लावाल तर तुम्हास अन्नाची किंवा मानाची काय वाण पडणार आहे ?" त्यांचाही औद्योगीकरणावरच भर होता.

आगरकरांचा विशेष म्हणजे त्यांनी स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याचा पुरस्कार केला होता. "स्त्रियांना चरितार्थसंपादक शिक्षण देण्याची आवश्यकता" त्यानी प्रतिपादन केली. असे प्रति-पादन करणारे हिंदुस्थानात आगरकर हे पहिलेच पुरुष असावेत.

न्या. मू. रानड्यांप्रमाणेच त्यानी जावाच्या 'कल्चर सिस्टिम'चा पुरस्कार केला होता. शेत-कऱ्यांच्या हिताकरिता शेतपेढ्या काढाव्यात, ही सर वेडरबर्न यांची सूचना त्यांनी उचलून धरली होती. अशा पेढ्या काढल्याने 'काळीचे उत्पन्न' वाढेल अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली.

देशाची औद्योगिक पाहणी (Industrial survey) करण्याची आवश्यकता त्यांनी सांगितली होती. आगरकरांनी ह्यातभर समतेचा हिरीरीने पुरस्कार केला होता. ही समतेची कल्पना जीवनाच्या सर्व क्षेत्रात रूढ व्हावी, असे त्यांना वाटत असे. त्याला अनुसरून 'गुलामांचे राष्ट्र' या लेखात त्यांनी "व्यक्ती अथवा कुटुंबाचा संपत्तीवरील मालकी हक्क नाहीसा करून देशातील संपत्तीचे सारे लोक समाईक मालक मानावे" असे विधान केले आहे. यावरून आगरकर समाजवादी विचारांकडे झुकलेले स्पष्टपणे दिसून येतात. आपल्या विचाराचे शेवटचे टोक गाठण्याची त्यांची तयारी होती. विष्णुबुवा ब्रह्मचारींनंतर समाजवादी विचार मांडणारे आगरकर हे पहिले होऊन गेले.

⊙ ⊙ ⊙

**"एक झाड दोन पक्षी"** : (आत्मचरित्र); विश्राम बेडेकर, पॉप्युलर प्रकाशन; मुंबई; पृष्ठे ३१५ किंमत रु. १००/–

विश्राम बेडेकर यांचे नाव एक मनस्वी लेखक व चित्रपटदिग्दर्शक म्हणून महाराष्ट्रात प्रसिद्ध आहे. बेडेकर यांची साहित्यसंपदा म्हणजे "ब्रह्मकुमारी" (१९३३), "नरो वा कुंजरो वा", "वाजे पाऊल आपुले" व "टिळक आणि आगरकर" (१९८२) ही नाटके; "रणांगण" (१९३९) ही कादंबरी, शेजारी, पहिला पाळणा, चूल आणि मूल, अमर भूपाळी इत्यादी चित्रपटांच्या पटकथा व अगदी अलीकडील म्हणजे "सिलिसबर्गची पत्रे" अशी मोजकीच आहे. परंतु बेडेकरांचे लिखाण त्यातील साहित्यमूल्यांमुळे साहित्यसमीक्षकांचे लक्ष वेधून घेत आले आहे. बेडेकर हे काळाच्या पुढे धावणारे असे साहित्यिक आहेत. याचे उदाहरण म्हणजे "रणांगण" ही कादंबरी होय. कारण या कादंबरीच्या प्रकाशनानंतर वीस वर्षांनी कुसुमावती देशपांडे, नरहर कुरुंदकर, गंगाधर गाडगीळ, सरोजिनी वैद्य, द. भि. कुलकर्णी, माधव आचवल वगैरे समीक्षकांनी "रणांगण" या भावकथेचे विश्लेषण व समीक्षा केली व ती भावकथा मराठीतील एक मानदंड मानली गेली. बोलपटांच्या सुरुवातीच्या काळात राम गणेश गडकरी व चिं. वि. जोशी यांच्या विनोदी लेखांवर चित्रपट काढण्याचा बेडेकर यांनी केलेला प्रयत्न व पुढील काळात लो. टिळक आणि भगतसिंग यांच्या जीवनावर चित्रपट काढण्याचा त्यांनी केलेला व व्यावसायिक कारणांमुळे त्यांना अर्धवट सोडावा लागलेला प्रयत्न म्हणजे बेडेकर यांना चित्रपट माध्यमातून काही नवीन, वेगळे व उदात्त दाखवण्याची जी इच्छा होती त्याचेच दर्शक होय.

अशा या चाकोरीवेगळ्या साहित्यिकाचे व कलावंताचे "एक झाड आणि दोन पक्षी" हे आत्मचरित्र असल्याने त्याकडे आपोआपच लक्ष वेधले जाते. माणसाचे एक मन जीवनाचा अनुभव घेते व दुसरे मन त्या अनुभवांचे विश्लेषण व चिंतन करते. चिंतन करणाऱ्या "मी" ने अनुभव घेणाऱ्या "मी" ची जीवनकथा सांगितली आहे. म्हणूनच हे आत्मकथन असूनही त्यात तृतीय पुरुषी निवेदन आहे. आत्मचरित्रकथनाची ही पद्धत नावीन्यपूर्ण अशी वाटते. तसेच जीवनातील अनेक प्रसंग चितारतांना ते सलगपणे न सांगता, कधी पुढील, तर कधी मागील प्रसंग अशी चित्रपट कथेप्रमाणे मांडणी झाली असल्याने वाचकांची उत्सुकता शेवटपर्यंत टिकून राहते.

पहिल्या भागात बेडेकर यांचे बालपण, उमरावती येथील त्यांचे मित्र व सुहृद, पुजाऱ्याच्या घरी जन्म झाल्याने बसलेले दारिद्र्याचे चटके, शिक्षणासाठी करावी लागलेली धडपड हा सर्व भाग आलेला आहे. एम्. ए. एल्‌एल्. बी. पर्यंत शिक्षण होऊन चित्रपटव्यवसायात पडणारे बेडेकर हे पहिलेच सुशिक्षित गृहस्थ होते. प्रथम "ब्रह्मकुमारी" या नाटकाच्या निमित्ताने ते "बलवंत संगीत मंडळीत" आले. तेथे चिंतामणराव कोल्हटकर आणि दीनानाथ मंगेशकर यांच्याशी त्यांचा निकट संबंध आला. हे पहिलेच नाटक व्यावसायिक दृष्ट्याही यशस्वी झाले. दीनानाथ मंगेशकर यांची त्यातील गौतमाची भूमिका म्हणजे त्यांच्या नाट्यगुणांचा कळस होता. त्यांची गौतमाची तापसी वेशभूषा, शास्त्रोक्त गाण्याची दमदारपणे होणारी आळवणी इत्यादी प्रेक्षकांना आकर्षित करीत असत. परंतु त्या सुमारास चित्रपटांचे प्रभावी माध्यम लोकप्रिय झाल्याने सर्वच नाटककंपन्यांना मंदीची लाट सोसावी लागली. त्यामुळे "बलवंत संगीत मंडळी" बंद होऊन तिचे "बलवंत पिक्चर्स" मध्ये रूपांतर झाले. सांगली येथे स्टुडिओ उभारून चित्रपटनिर्मितीचा केलेला प्रयत्न व त्यामुळे आलेल्या आर्थिक संकटामुळे चिंतामणराव कोल्हटकर,






व दीनानाथ मंगेशकर यांची झालेली ससेहोलपट यांचे अत्यंत प्रत्ययकारी असे वर्णन बेडेकर यांनी केलेले आहे. त्यातून सावरण्यासाठी सुरू केलेले "भट-बेडेकर प्रॉडक्शन" व त्यातही आलेले अपयश यामुळे बेडेकरांसारखा मनस्वी स्वभावाचा लेखक खचून गेला नसता, तरच नवल ! या अनुभवावरून शहाणपणा शिकून त्यानंतर बेडेकर यांनी स्वत: निर्माता होण्याचा प्रयत्न सोडून देऊन चित्रपटात फक्त लेखक व दिग्दर्शक असेच काम स्वीकारल्यामुळे त्यांच्या हातून उत्तमोत्तम चित्रपटांची निर्मिती होऊ शकली.

सांगली येथील चित्रनिर्मितीच्या व्यवसायात अपयश आले व त्याच सुमारास बेडेकर यांना अचानकपणे इंग्लंडमध्ये चित्रपटनिर्मितीचे शिक्षण घेण्यासाठी एक शिष्यवृत्ती मिळाली. याच सुमारास त्यांच्या आयुष्यातील दुसरी महत्त्वाची घटना म्हणजे त्यावेळच्या सुप्रसिद्ध लेखिका बाळुताई खरे उर्फ "विभावरी शिरूरकर" यांच्याशी बेडेकर यांचा विवाह झाला. बेडेकर यांचा पहिला विवाह त्यांच्या अगदी तरुण वयात झालेला होता; परंतु त्या संसारात त्यांचे मन रमले नव्हते व ते एक प्रकारचे एकाकी जीवनच जगत होते. बाळुताई खरे यांच्याबरोबर बरीच वर्षे असलेल्या ओळखीची परिणती त्यांच्या बरोबरच्या विवाहात झाली आणि या विवाहानंतर त्यांना ताबडतोब इंग्लंडला जावे लागले.

इंग्लंड म्हणजे पन्नास वर्षांपूर्वीच्या सुशिक्षितांच्या लेखी एक यक्षभूमी, असे बेडेकरांनी म्हटले आहे. इंग्लंडमध्ये ते काही महिनेच राहिले. दुसऱ्या महायुद्धाच्या भडकत चाललेल्या वणव्यामुळे त्यांना इंग्लंडमधील शिक्षण अर्धवट सोडून परत यावे लागले. इंग्लंडमधील लोकशाहीचे व तेथील व्यक्तिस्वातंत्र्याचे दर्शन बेडेकर यांना घडले व त्या पार्श्वभूमीवर त्यावेळची भारताची गुलामगिरी फारच प्रकर्षाने जाणवली. लंडनमध्ये त्यांना आलेला पोलीस खात्याचा अनुभव व त्याच्या तुलनेत नासिक येथे एकदा आलेला पोलीस खात्याचा अनुभव याचे अत्यंत प्रत्ययकारी असे वर्णन बेडेकर यांनी केलेले आहे. भारतास स्वराज्य मिळून ३५ वर्षे होऊन गेली. तरीही बेडेकर यांनी त्यांच्या तरुणपणातील नासिक येथील पोलीस स्टेशनचे जे वर्णन केलेले आहे, त्या परिस्थितीत अद्याप कोणताही फरक झालेला नाही. पोलिसी हडेलहप्पीपुढे नागरिकांचे व्यक्तिस्वातंत्र्य टिकू शकत नाही, असाच अनुभव अद्यापही अनकदा येतो. त्यामुळे बेडेकर यांच्या आत्मचरित्रातील तो प्रसंग वाचताना मनास उद्विग्नता येते.

इंग्लंडमध्ये व तेथून परत येत असताना बोटीवर बेडेकर यांना पोलंडमधील निर्वासितांची जी परिस्थिती पहावयास मिळाली, त्यातूनच त्यांची "रणांगण" ही कादंबरी तयार झालेली आहे. बेडेकर इंग्लंडहून परत आले, त्यावेळी त्यांच्या पत्नीस सोलापूर येथे नोकरी मिळालेली होती व ती, गुन्हेगार म्हणून समजल्या गेलेल्या जमातींच्या वसाहतींची सुपरिंटेंडंट, अशा स्वरूपाची होती. बेडेकर तेथे काही दिवस राहिले. तेथील वास्तव्याचे त्यांनी केलेले वर्णन हे 'उंबरठा' या चित्रपटात दाखविलेल्या महिलाश्रमाच्या सुपरिंटेंडंटच्या आश्रमातील तिच्या पतीच्या वास्तव्याशी अतिशय मिळतेजुळते असे आहे. तेथे मन न रमल्यामुळे बेडेकर हे पुन्हा चित्रपटव्यवसायाकडे वळले.

पुणे, मुंबई व कोल्हापूर येथे चित्रपटनिर्मितीच्या निमित्ताने बेडेकर यांना वेळोवेळी करावे लागलेले वास्तव्य व त्या व्यवसायानिमित्ताने संबंध आलेल्या अनेक प्रसिद्ध व्यक्ती यांचे चित्रणही अत्यंत आकर्षक असे झालेले आहे. चित्रपट व्यवसायातील अस्थिरता व मोह, तसेच व्यावसायिक तडजोड करताना कलावंतांची होणारी ओढाताण व स्वतः चित्रपटनिर्मिती करण्याच्या मोहातून अनेकांची झालेली ससेहोलपट यांचे चित्रणही अत्यंत प्रत्ययकारी असेच आहे. चित्रपटव्यवसायात मद्य व मदिराक्षी यांच्या मोहातून सुटलेला माणूस क्वचितच. बेडेकर हेही त्यातून सुटलेले नाहीत. त्याबाबतही प्रांजळ असे कथन त्यांनी केलेले आहे. बेडेकर यांचे संपूर्ण आयुष्यच चित्रपटसृष्टीत गेले असल्याने तेथे काम करणाऱ्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांची परिस्थिती, व्यवसायातील अस्थिरता, भांडवलदारांची कुरघोडी, कलावंतांचा लहरीपणा या सर्वांचे अत्यंत प्रत्ययकारी असे चित्रण झालेले असूनही, बाहेरून आकर्षक दिसणाऱ्या या चंदेरी दुनियेतील व्यक्तींच्या वाट्याला येणारे कधी वैभवाचे, तर कधी बेकारीचे जीवन व होणारी मानसिक

ओढाताण यांचा अतिशय उत्तम आलेख बेडेकर यांनी काढलेला आहे. लो. टिळक व भगतसिंग यांच्या जीवनावरील चित्रपट ते पुरे करू शकले नाहीत. याची कायमची बोच त्यांचे मनात राहिलेली आहे.

अगदी अलीकडच्या काळात बेडेकर यांना स्वित्झलंडमधील सिलिस्बर्ग येथे महर्षी महेश योगी यांच्या आश्रमात माहितीपट काढण्याच्या कामासाठी वास्तव्य करण्याचा योग आला. तेथून त्यांनी लिहिलेली "सिलिस्बर्गची पत्रे" प्रसिद्ध झालेली आहेत. बेडेकर व त्यांच्या लेखिका–पत्नी यांच्या–मधील झालेला सर्व पत्रव्यवहार १९६१ च्या पानशेत प्रलयात नष्ट झाला आहे. "कुसुमानिल" प्रमाणे तो प्रसिद्ध होण्याची कोणतीही शक्यता नाही. त्यामुळे बेडेकर व मालतीबाई यांच्या भावजीवनाचे चित्रण या आत्मचरित्रात आणखी प्रत्ययकारी रीतीने यावयास पाहिजे होते, असे वाटते. परंतु त्याबाबत फारच त्रोटक असे वर्णन आलेले आहे.

बेडेकर हे नुसतेच कलावंत नसून एक चिंतनशील विचारवंत आहेत, याचा प्रत्यय या आत्मचरित्रात पदोपदी येतो. तसेच चित्रपटकथेच्या पद्धतीने केलेली मांडणी व आकर्षक भाषाशैली यांमुळे हे आत्मचरित्र पहिल्यापासून शेवटपर्यंत वाचत रहावेसे वाटते. बेडेकर यांच्या या आत्मचरित्रामुळे मराठीतील आत्मचरित्रात्मक वाङ्मयात मोलाची भर पडली आहे.

**– अशोक भट**

---

**लोकधाटी;** (समीक्षा) : द. ग. गोडसे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९७९, पृष्ठे १००, मूल्य १६ रु.

**मातावळ;** (समीक्षा) द. ग. गोडसे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८१, पृष्ठे ५७, मूल्य १६ रु.

---

'लोकधाटी' आणि 'मातावळ' हे लोकधाटी आविष्काराची सर्वस्वी वेगळी समीक्षा करणाऱ्या टिपणा–टाचणांचे दोन संग्रह. 'लोकधाटी' आविष्काराची नेमकी गमके कोणती, यांचा शोध घेताना विचारधारेचे जे सूत्र द. ग. गोडसे यांनी 'पोत', 'शक्तिसौष्ठव' आणि 'गतिमानी' यांत स्वीकारले आहे, तेच सूत्र 'लोकधाटी'प्रमाणेच त्यांच्या 'मातावळ' मधील टाचणातही आढळते. वस्तुतः हे सूत्र त्यांनी सिद्धांतरूपाने मांडणे अवश्य होते. कारण ते त्या तोलामोलाचे आहे. पण लोकधाटी आविष्काराची त्यांना जाणवलेली गमके एखाद्या गणितमानी हिशेबी शास्त्रधाटीत बसवणे त्यांना योग्य वाटले नाही. कारण लोकधाटी आविष्काराची वाक-वळणे आणि शक्तिसौष्ठव यांची समीक्षा वेगळ्या मूल्यमापनाची आणि स्वतंत्र परिभाषेने केल्यानेच त्यांची खरी समीक्षा होऊ शकते, असे त्यांचे स्पष्ट आणि स्वच्छ मत बनले आहे. आणि म्हणून टिपणा-टाचणाची मोकळी, स्वैर आणि प्रवाही विचारधाराच त्यांनी पसंत केली आणि तिचाच अवलंब 'लोकधाटी' आणि 'मातावळ' या दोन्हींत केला आहे.

'लोकधाटी' तील विचारधारांना 'मातावळ' मध्ये एक घणसर पायाभूत आधार मिळालेला आहे. कारण लोकधाटी भावविश्व हे भूगोलांतर्गत कासवीच्या पाठीवर पेललेले असल्याने तिच्या केवळ मातृधर्मी दृष्टिक्षेपाने लोकधाटी आविष्काराची घडण, घाट आणि सौष्ठव ही सृष्टिमान्य आविष्कार-परंपरेतील थाट-घाटाची बनली आहेत. आणि म्हणून प्रस्तुत 'लोकधाटी' आणि 'मातावळ' या दोहोंचा विचार एकत्र करण्याचे ठरविले आहे.

पण हा विचार करतांना आणि गोडश्यांना लोकधाटीसंबंधी जे भावले, जे जाणवले आणि त्यांनी टिपणरूपाने का होईना जी सर्वस्वी स्वतंत्र समीक्षा केली, ती तर शिष्टमान्य नागरसमीक्षेहून पूर्णपणे भिन्न आणि मी वा अन्य अभ्यासक तर त्याच शिष्टमान्य गणिती समीक्षापद्धतीच्या परंपरेत वाढलेपोसलेलो : अर्थात् साहित्य आधी आणि मग शास्त्र यांचे भान असल्याने ज्यावेळी परंपरा सोडून नवे साहित्य निर्माण झाले, तेव्हा समीक्षेनेही नवा मार्ग पत्करला आहे. पण सामान्यपणे त्या नव्या समीक्षेवरही शास्त्रधाटी समीक्षापद्धतीचा प्रभाव पूर्णपणे नव्हताच, असे नव्हे. आणखी एक अडचण येते : ती अशी की, साहित्याची समीक्षा करणारे जे असतात, ते साहित्येतर अन्य कलांत कितपत जाणकार असतात याची शंका आहे. नव्हे, ते प्रामुख्याने साहित्याचेच समीक्षक असतात. चित्र, शिल्प, संगीत इत्यादींप्रमाणे साहित्य हीही एक कलाच आहे. याची जाण असूनही अन्य कलांचा



अनुक्रमणिका

साहित्यसमीक्षेत म्हणावा तसा विचार होत नाही. नाही म्हणायला, मर्ढेकरांचा येथे अपवाद आठवतो. पण तेही अखेर लयीच्या विचार-संवाद-विरोध-समतोल या तालतत्त्वाच्या गणितमानी सूत्रालाच बळी पडतात.

गोडश्यांची समीक्षा स्वर-रेषा-शब्दादींतून निर्माण होणाऱ्या साऱ्याच कलांचे भान ठेवीत असल्याने आणि पुनः लोकधाटी आविष्काराची गमके शोधताना शिष्टमान्य नागर शास्त्रधाटींचा ती पूर्णपणे त्याग करीत असल्याने त्यांची समीक्षा वेगळ्या सौष्ठवमूल्यांनी आणि सर्वस्वी वेगळ्या परिभाषेने सिद्ध झाली आहे. याचे आणखीही एक कारण दिसते आणि ते म्हणजे गोडसे मानवनिर्मित कला आणि निसर्गनिर्मित कला यांत भेद करीत नाहीत. नागर-शास्त्रधाटी समीक्षक मानवनिर्मित कलांचाच विचार करतात. नव्हे अशा मानवनिर्मित आविष्कारालाच कला म्हणतात हे येथे आठवावे. शिवाय मानवनिर्मित आविष्काराबरोबर (तेही नागर नव्हेत) निसर्गनिर्मित आविष्कारांचा विचार करताना गोडसे प्रथम ते ते लोक–आविष्कार बारकाईने पाहतात, त्यातले 'भावन' जाणवून घेतात आणि मगच निष्कर्ष काढतात. आणि या साऱ्या प्रक्रियेत ज्या ज्या ज्ञानशाखेचा संबंध येईल, त्या त्या ज्ञानशाखेचा अभ्यासही करतात. त्यामुळेच त्यांच्या विचारसूत्रांचे करदोडे घट्ट जुळले जाऊन त्यांची समीक्षाही भूगर्भांतर्गत कूर्मीच्या घणसर पाठीवर उभी राहिल्यासारखी शक्तिसौष्ठवपूर्ण होताना दिसते.

गोखल्यांचे समीक्षाविषय आणि त्यांची समीक्षा ही परंपरागत समीक्षेहून कशी वेगळी आहे आणि त्यामुळे परंपरागत सौष्ठवमूल्ये त्यांची समीक्षा करण्यास कशी व का असमर्थ ठरतात, हे नमूद केल्यानंतर त्यांच्या 'लोकधाटी' आणि 'मातावळ' या दोन टिपण-टाचण संग्रहांकडे वळणे योग्य ठरते.

गोडश्यांच्यामधला 'डिझाइनर' कलावंत हा नेहमी पारंपरिक सुंदर वस्तूपेक्षा त्याबाहेरील दुर्लक्षित, सामान्यपणे ज्यांना सुंदर म्हटले जात नसते, अशा अनगड सौंदर्यवस्तूंचा शोध घेत असतो. हे एक विशेषच म्हटले पाहिजे. त्यासाठी जी वेगळी दृष्टी हवी असते आणि मतामतांचा जो मोकळेपणा हवा असतो, तो त्यांच्याजवळ आहे. आणि म्हणून त्यांचे लक्ष एका आदिवासी शिल्पाकडे गेले. त्या शिल्पात त्यांना नागर लालित्याचा अभाव आढळला; पण ओबडधोबड शिल्पातही मानवी आकृती कशी, हा प्रश्न त्यांना पडला. येथे एक गोष्ट लक्षात येते की, कोणतेही गृहीतकृत्य न स्विकारता समोर येणाऱ्या प्रश्नांचीं उत्तरे गोडसे शोधतात. त्यानुसार हे आदिवासींच्या श्रद्धाविश्वातले शिल्प म्हणावे, तर आदिवासींची श्रद्धा मूर्तींच्याऐवजी दगडधोंड्यांची पूजा करताना दिसते. मग या ओबडधोबड शिल्पात मानवाकृती कशी? तर जवळच असणाऱ्या शाक्तपंथीय योगिनीमंदिरातील योगिनींच्या नागर संस्कृतीच्या मूर्तींचा तो परिणाम असावा, असा ते निष्कर्ष काढतात. कारण नागर शिल्प हे तंत्रप्रगत आणि शास्त्रशुद्ध असते, तर आदिवासी शिल्प हे अप्रगत आणि शास्त्रविहीन असते. याचे कारणही गोडसे जे देतात ते असे की, आदिवासींचे भावविश्वच वेगळे असते. आणि म्हणून त्यांची आविष्कार–प्रक्रियाही वेगळी असते. आता येथे गोडश्यांतला जातिवंत संशोधक जागा होतो आणि तो लोकाविष्काराचे भावविश्व, आणि ते व्यक्त करणारी प्रक्रिया तपासण्यास सुरुवात करतो. अर्थात ही सुरुवात गोडसे रंग-रेषा-स्वर–यांच्या मुक्त, आवेशी आणि स्वयंप्रवाही साधनांनी जे आदिवासी भावविश्व वा जो आशय, किंवा गोडसे ज्याला 'भावन' ही संज्ञा वापरतात त्या भावनाच्या; संकल्पनाच्या शोधापासून होते. त्यासाठी गोडसे शेतकरी संस्कृतीच्याही खूप आधीच्या शिकारी संस्कृतीकडे आणि तिच्यातील चित्र-शिल्पांकडे जेव्हा वळतात, तेव्हा त्यांना आढळते की, शिकारी संस्कृतीत प्राण्यांची जी चित्रे काढली जात व जी गाणी म्हटली जात आणि जी वाद्ये वाजवली जात, ते सारे केवळ एक विक्रीडित नव्हते, तर तो एक 'यातुविधी' होता. शिकार हाच त्याचा उद्देश होता आणि तो साधण्यासाठी व सावजाला फसवण्यासाठी ते केवळ एक नाटक होते. या आपल्या निष्कर्षाच्या पुष्टचर्थ त्यांनी एक शिकारी गीतही दिले आहे.

शिकारीमानवाचा शेतकरी झाला, तरी त्याचे भावविश्व आणि श्रद्धाविश्व थोड्याफार फरकाने अजूनही शिकारीमानवाच्या भाव आणि श्रद्धाविश्वासारखेच आहे. किंबहुना दोघांच्याही आवि-

अनुक्रमणिका

ष्काराचे थाट-घाटतत्त्व एकाच वळणाचे असते, म्हणजे तेथे कुठेही नियमित मापनाची बांधिलकी नसते. ते स्वयंप्रवाही, लयतत्त्वयुक्त, शक्तिभारी आणि मुक्त असते, असा निष्कर्ष गोडसे काढतात.

येथे गोडसे आणखीही एक महत्त्वाचा निष्कर्ष काढताना दिसतात. तो निष्कर्ष असा की, लोकाविष्कार हा भावन-अनुसारी असल्याने तो भावमात्र रूप असतो, नागर आविष्काराप्रमाणे तो बाह्य रंग, रूप, आकार यांना महत्त्व देत नसतो– म्हणजेच तो यथादृष्ट आणि यथासदृश पार्थिव नसतो, की त्या रूपातील तार्किक निश्चितताही त्यात नसते. तो फक्त भावज्ञ अनुसारी असती.

याच अनुषंगात गोडसे यांचे लक्ष ग्रामीण ओवीची प्राकृतिक घडण आणि तिचे गेयरूप याकडे वळते. आणि ग्रामीण ओवीची गेयता जात्याच्या भ्रमण-प्रक्रियेनुसार कशी असते, तिच्यात शब्दांना महत्त्व कसे नसते आणि केवळ ग्रामीणांचे श्रद्धाविश्व वा भावविश्वच ग्रामीण प्रतिमासृष्टीच्या आधारे, ती कशी व्यक्त करते हे त्यांच्या लक्षात येते.

लोकधाटीतील चित्र, शिल्प काय किंवा गेय ओवी काय यांची गमके वरीलप्रमाणे शोधताना चित्रकार गोडसे यांना १९ व्या शतकातील स्वतःला आदिवासी (प्रिमिटिव्ह) म्हणवून घेणाऱ्या आणि "चित्रकार मनाने आदिमानवच आहे" असे म्हणणाऱ्या पॉल गोगँ, सेझान आणि व्हॉन गॉख यांची आठवण झाल्यास नवल नाही. किंबहुना ताहिती बेटावर 'गतिमानी शक्तभार' उत्कटपणे जाणवल्याने गोगँ त्या बेटावरच कसा राहिला आणि लोकधाटीची अनेक गमके असणारी आणि 'भावमात्रत्व' व्यक्त करणारी चित्रे त्याने कशी काढली, हे ते सांगतात.

सारांश, अर्थपूर्ण घाट हे नागरी आविष्काराचे गमक; तर 'सार्थ शक्तभार' हे लोकधाटी आविष्काराचे गमक. हा निष्कर्ष काढून कंसवधाच्या एका प्राक्कथेवरील ग्रामीण गीताचे विस्ताराने निरीक्षण करून त्यात ग्रामीणजीवननिष्ठ आशयच कसा लोकधाटीला अनुसरून व्यक्त होतो आहे, हे ते स्पष्ट करतात. हे झाले, गोडसे यांनी 'लोकधाटी' आविष्काराचे केलेले अवलोकन, भावन आणि विश्लेषण.

या 'लोकधाटी' आविष्काराच्या विचारातूनच सुचलेला पुढचा विषय म्हणजे लोकधाटी आविष्कारातील वाक-युक्त वळणांचा किंवा वळणचलनांचा विचार. या विचारातूनच सरळ रेषा निर्जीव असते, तर वळणयुक्त रेषा जिवंत आणि सौष्ठवपूर्ण असते, याची गोडश्यांना जाणीव झाली. त्या जोडीलाच वाकवळणांच्या घडणप्रक्रियेचे मूळ गतिमानतेत असते, हेही त्यांच्या ध्यानात आले. पण गतीमुळे वाकाची निर्मिती नेमकी होते कशी, हा मूलभूत प्रश्न त्यांच्यापुढे ठाकला. या संदर्भात वाचन करताना त्यांना अतिप्राचीन काळचे शैलशिल्पाचे नमुने, दगडात दडलेला स्वयंभू लोहचुंबक व त्या आधारे तयार केलेले आदिम, दगडी होकायंत्र आणि चुंबक-दगडाच्या साक्षाने कोरलेले कासव यांचा शोध लागला. आता दगडातील चुंबकशक्ती ही केवळ उपयुक्त गुण न राहता मूल्य ठरू शकत होती, हेही त्यांच्या लक्षात आले. पण पुनः लोकधाटी आविष्कारातील वाक-तत्त्वाचा आणि चुंबकाचा काय संबंध आहे, हा आणखी एक प्रश्न पुढे उभा ठाकलाच. एका परीने शिष्टमान्य शास्त्रधाटी आविष्कारपरंपरेहून वेगळी अशी गोडश्यांची लोकधाटी आविष्काराची समीक्षा म्हणजे एक प्रश्नोपनिषदच दिसते. ते काही असो, प्रश्नाचे उत्तर तर शोधलेच पाहिजे आणि गोडश्यांसारखा चिकाटीचा समीक्षक मध्येच हात गाळणारा नाही. लोकाविष्काराचे भावविश्व भूमीशी निगडित असल्याने त्यांचे लक्ष पृथ्वीची भौतिक रचना, तिचे तीन स्तर, तिचे स्वतः-भोवतीचे आणि पुनः सूर्याभोवतीचे भ्रमण आणि भूगर्भातील चुंबकशक्ती यांच्या अभ्यासाकडे वळले आणि त्यांना जाणवले, की वाकतत्त्वाचे मूळ म्हणजे भूगोलांतर्गत चुंबकशक्ती आणि पृथ्वीच्या पृष्ठभागावरील सृष्टी यांच्या परस्परसंबंधातून वाक-तत्त्व निष्पन्न होत असावे.

प्रस्तुत लोकधाटी आविष्काराच्या घडणीतील वाकतत्त्वाच्या अभ्यासासाठी लहानपणी पाहिलेल्या नदीच्या पात्रातील असंख्य आकारांच्या गोट्यांची त्यांना आठवण झाली आणि त्यांच्या लक्षात आले की, या साऱ्या दगडांना एक शिल्पी परिमाण आहे. त्यात एक प्रकारचे लोकधाटी सौष्ठव आहे आणि पुनः त्या सौष्ठवालाही विराट गतिमानतेचे एक अंगभूत परिमाण आहे. लोकधाटी मडके आणि ग्रामीण ओवी यांच्याशी जवळचे नाते सांगणारे ते

आहे. गोडश्यांचा दगडांचा अभ्यास येथच संपत नाही, तर त्यांना वेगवेगळी वाक-वळणे कशी आली, नदीच्या प्रवाहगतीशी त्यांचा संबंध आहे का, असल्यास कितपत, तसेच या गतीमुळे त्या गोटयांना निवळणी, अर्धगोखुरी आणि अंडगोली असे आकार का आले, असे प्रश्न गोडश्यांच्या समोर ठाकले आणि मग त्यांना वाटले की, केवळ गतीमुळे ही वाक-वळणे आलेली नाहीत तर, त्यामागे भूगर्भांतर चुंबकशक्ती असते आणि तीच दगडांना वाक-वळणे देते.

येथे गोडश्यांनी नागरशास्त्रधाटी आविष्कारातील 'लय' ही संकल्पना आणि लोकधाटी आविष्कारातील 'चलन' ही संकल्पना यांतील फरक फार चांगल्या प्रकारे दाखविलेला आहे. दगडाच्या घाटाचे अंगभूत 'चलन' अनियमित असते, तसेच ते तालबद्धही असत नाही. शास्त्रशुद्ध धाटीतील संवाद, विरोध, समतोल यांपैकी कोणतेही सूत्र त्याला मान्य नसते. किंबहुना हे 'चलन' शक्तधुंद असते आणि ते भूगोलांतर्गत प्रचंड चुंबकशक्ती आणि भूगोलांगभूत विराटगती यांच्याशी निगडित असते आणि म्हणूनच या लोकधाटी परंपरेतील आविष्काराची घडण आणि घाट यांची सौष्ठवमूल्ये शिष्टमान्य सांप्रदायिक मूल्यांहून वेगळी ठरतात आणि त्यांची सामीक्षाही गोडश्यांच्या एकंदर विवेचनानुसार सर्वस्वी वेगळ्या परिभाषेसह सिद्ध होते.

लोकधाटी आविष्काराची ही समीक्षावैशिष्टये ( ज्यात शक्तधुंदी, गतिमानता आणि लवचिक अनियमितपणा यांचा समावेश होतो ) नमूद केल्यावर त्यांची उदाहरणे म्हणून 'लोकधाटी' या त्यांच्याच पुस्तकात दिलेले कंसवधाचे ग्रामीण गीत आणि आदिवासींचे शिष्टमान्य शास्त्रधाटीला ओबडधोबड वाटेल असे शिल्प यांची उदाहरणे देतात आणि त्यांचे लोकधाटी आविष्कारांच्या निकषानुसार समीक्षणही करतात. त्या निकषान्वये कंसवधाच्या लोकगीतात ग्रामीण जीवनाचे भावविश्वच आदिम प्रतिमांच्या रूपात साकार होते. तसेच आदिवासी शिल्पांत आदिवासी श्रद्धाविश्व म्हणजेच त्यांचे 'भावन' कोरलेले असते. येथे शक्तीचे निमित्त करून स्त्रीचे बाह्यरूप कोरलेले नसते, तर स्त्रीच्या आदिम रूपात जी गूढ शक्ती—'भावन' असते, तीं साकार करण्याचा प्रयत्न असतो.

सारांश, आदिवासींची लोकधाटी आणि नागरांची शास्त्रधाटी यांच्या मूळ श्रद्धानिष्ठांतच फरक असतो आणि म्हणून लोकधाटी आविष्कार जे दिसते ते टिपण्यापेक्षा जे भावते ते टिपतो आणि म्हणून गोडसे अखेर म्हणतात की, लोकधाटी आविष्कारातील घडण, घाट आणि सौष्ठव यांच्याशी एकरूप व्हावयाचे असेल, तर प्रथम नागर संस्कार विसरणे आवश्यक ठरते. गोडश्यांची समीक्षा नागर शिष्टमान्य समीक्षेहून सर्वस्वी भिन्न ठरते, ती लोकधाटी आविष्कारविश्वाशी एकरूप होण्याची आणि त्यांची 'भावन' क्षमता बाणवण्याची अंगी क्षमता त्यांच्यात आहे म्हणून. 'पोत' पासून 'मातावळ' पर्यंत त्यांनी जी समीक्षा केलेली आहे, तीत याचा प्रत्यय तर येतोच, पण 'लोकधाटी' आणि 'मातावळ' यांत तो प्रामुख्यानें आणि आधिक्यानें व्यक्त होतो आहे. मराठीत ही स्वतंत्र व सर्वस्वी नवीन परिभाषेतील समीक्षा नव्याने अवतरते आहे. त्याचे श्रेय अर्थात गोडश्यांनाच दिले पाहिजे आणि सौंदर्याच्या (मग ते सौंदर्य मानवनिर्मित असो, वा निसर्गनिर्मित असो) आस्वादकांनी आणि समीक्षकांनीही त्याचा योग्य तो परामर्शही घेतला पाहिजे. कारण सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे गोडसे यांनी 'लोकधाटी' आणि 'मातावळ' यांच्या लेखनात टिपणा—टाचणांचाच उपयोग केला असला, तरी त्यातून लोकधाटी आविष्काराच्या मूल्यमापनाचा विवक्षित सिद्धांतच व्यक्त होतो आहे. गोडश्यांचे मराठी समीक्षाक्षेत्रातील वेगळेपणाही त्यातच आहे.

—गं. ब. ग्रामोपाध्ये

---

**रामकृष्ण आणि विवेकानन्द : एक दर्शन :** ले. डॉ. वि. रा. करंदीकर; पुणे, कॉंटिनेंटल प्रकाशन, १९६२; पृ. २१ + ५७८; कि. रु. ६०/-.

---

'रामकृष्ण आणि विवेकानंद : एक विहंगमदर्शन' या विषयावर कै. प्रभाकर पाध्ये यांच्या सूचनेवरून दि. ३ ते ७ नोव्हें. १९७६ रोजी पुण्यातील लोक-

मान्य टिळक स्मारक मंदिरात दिल्या गेलेल्या पाच व्याख्यानांनी नटलेला हा सहाशे पानांचा ग्रंथ! व्याख्याने देऊन झाल्यावर ती प्रकाशकापर्यंत मुद्रण-प्रत होऊन जाईपर्यंत मध्ये काही वर्षे लोटली, पण डॉ. करंदीकरांच्या जिद्दीने 'हाती घ्याल ते तडीस न्या' या सवयीमुळे ते काम परिपूर्ण होऊन ७ मे १९८२ (बुद्ध पौर्णिमा) या दिवशी प्रसिद्ध झाले. श्री. रामकृष्णचरणी अर्पण केलेल्या ग्रंथाचे लेखन करताना डॉ. करंदीकर हे रामकृष्ण व विवेकानंद यांच्या जीवनाचे व विचारांचे चिंतन करण्यात दोन-तीन वर्षे गुंग होऊन जणू काही परमहंसांचे सश्रद्ध भक्त बनले होते. त्यामुळे त्यांना– 'आपल्या मनाचे उन्नयन होत असल्याचा अनुभव आला.'– हे या विषयांत रमणाऱ्या कोणाही व्यक्तीचे वैशिष्टयच समजले गेले पाहिजे.

महाराष्ट्रात, भारतात आणि भारताबाहेरील जगातही ठिकठिकाणी रामकृष्णमठ स्थापन झालेले आहेत. रामकृष्ण परमहंसांच्या विचारांचा फैलाव व आचार त्यामुळे बराच वाढला आहे. मराठीमधून रामकृष्णांची व विवेकानंदांची समग्र माहिती मिळ-विण्यास हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त असा ठरावा, या-साठी जेवढे अथक परिश्रम करायला हवेत, तेवढे डॉ. करंदीकरांनी जरूर केले आहेत, हे प्रत्येक पानो-पानी नजरेस पडते. रामकृष्ण व विवेकानंद यांचा, दोन वेगवेगळी परिशिष्टे जोडून दिलेला जीवनपट निष्ठावंत वाचकाला मार्गदर्शकच ठरेल. पृ. ५४३ ते ५६३ या एकवीस पृष्ठांत खचाखच भरलेला व्यक्ति-परिचय–रामकृष्ण व विवेकानंद यांचे जीवनदर्शन घडविताना ज्या ज्या व्यक्तींचा उल्लेख आलेला आहे, त्यांची संपूर्ण माहिती देऊन जातो. तसेच ज्या पुस्तकांच्या आधारे डॉ. करंदीकरांनी या व्याख्या-नांची जडण-घडण मढवली, त्यांचीही यादी शेवटी ५६४ पृ. वर दिली आहे. या आधारभूत ग्रंथांत भारतीय ग्रंथकार आहेत. तसेच –मॅक्समुल्लर, रोमांरोला, मेरी लुइस बुर्के या मान्यवर पाश्चात्य ग्रंथकारांचे ग्रंथही डॉ. करंदीकरांच्या विवेचक व चिकित्सक बुद्धीतून सुटलेले नाहीत.

गदाधरचा (रामकृष्ण परमहंसांचे मूळ नाव) जन्म १८ फेब्रु. १८३६ व १५ ऑगस्ट १९८६ मध्ये अतिसाराने मृत्यू-फक्त ५०॥ वर्षांची जीवनयात्रा! तर मृत्यूपूर्वी चार-पाच महिनेच अगोदर मार्च १८८६ मध्ये परमहंसांनी विवेकानंदांना (पूर्वाश्रमीचे नरेन्द्र दत्त) प्रत्यक्ष देवीचे दर्शन घडवून समाधि-अवस्था प्राप्त करून दिली. नरेन्द्राचा जन्म १२ जाने. १८६३ तर मृत्यू ४ जुलै १९०२ रोजी बेलूर-मठात! म्हणजे वयाच्या तेविसाव्या वर्षी विवेका-नंदांना ती दिव्यदृष्टी प्राप्त झाली. तेथपासून १५ वर्षे अखंड परिश्रम करून विवेकानंदांनी रामकृष्णांच्या तपस्येचा प्रभाव संपूर्ण भारतभर तर पाडलाच; पण भारताबाहेरही यूरोप, अमेरिकादी विज्ञान-दृष्टीने अद्ययावत असलेल्या देशांतही पारंपरिक भक्ति-श्रद्धेचा झेंडा रोवण्यास आणि माणसांमध्ये सेवाभाव निर्माण करण्यात अभूतपूर्व यश मिळविले, हीच खरं म्हणजे गुरु–शिष्यांच्या कार्याची रोख पावती आहे, असे समजले पाहिजे.

गदाधरचे वडील वयाच्या सातव्या वर्षीच वारले. त्यांचे लक्ष शाळेत रमलेच नाही. शालेय शिक्षण न मिळालेल्या या मुलाचा तीव्र ओढा ईश्वरविषया-कडे होता. तो ओढा शेवटपर्यंत कायम टिकला. त्यांचे लग्न मे १८५९ मध्ये वयाच्या तेविसाव्या वर्षी पाच वर्षे वय असलेल्या, जयराम भाटीच्या शारदा मुखर्जी या, एकोणीस वर्षांनी लहान असलेल्या मुलीशी लावण्यात आले. गदाधरचे सारे लक्ष कालिमातेच्या दर्शनात रममाण झालेले असल्याने त्याला मूलबाळ काही झाले नाही. आधुनिक अर्थाने रामकृष्णांचे शिक्षण झाले नव्हते, पण अध्यात्मामधील त्यांचा स्वानुभव व रोकड्याव्यवहारातील दाखले देऊन अशिक्षित लोकांना आध्यामिक ज्ञानाची ओळख करून देण्याची त्यांची रीत विशेष होती. प्रपंच करताना वृत्ती कशी निष्काम ठेवावी, याचा त्यांनी दिलेला दाखला :

'आपलं काम करीत असावं. बायका, पोरं, आई-बाप, साऱ्यांचं सारं करावं, पण मनाशी पक्की खूण-गाठ बांधून ठेवावी की, ते आपले कुणीच नाहीत. थोरामोठ्यांच्या घरची मोलकरीण मालकाचा सारा कामधंदा उरकते, पण तिचं मन मात्र गुंतलेलं असतं तिच्या स्वतःच्या घरच्या माणसांत. मालकाच्या मुलाला ती 'माझ्या सोन्या' म्हणून कुरवाळील, गोंजारील; पण तिला पक्कं माहीत असतं की, ही माणसं आपली कुणी नव्हत.'

अनुक्रमणिका






प्रपंच करावा, कर्तव्यबुद्धीने त्यातील सारी कामे करावी, पण कशातही आपले मन गुंतवू नये, म्हणजे सारे काही करत असता मनाने असक्त असावे.

रामकृष्णांचे पहिले गुरू चंद्र आणि गिरिजा. यांची अधिक माहिती करंदीकरांनी दिली नाही. ते तंत्रमार्गातील पूर्वबंगालमध्ये राहणारे. तिसरा महत्वाचा गुरू म्हणून त्यांच्या आयुष्यात आलेली 'भैरवी ब्राह्मणी' हीही तंत्रमार्गाचाच अवलंब करणारी. रामकृष्णांपेक्षा वयाने मोठी असल्याने तिने जवळजवळ ६ वर्षे रामकृष्णाला जणू आपल्या कह्यातच ठेवले होते. अद्वैतमार्गाचा अस्सल उपदेश देऊन संन्यासदीक्षा देवविणारा महत्त्वाचा पुरुष म्हणजे '**तोतापुरी**'. लुधियाना येथील नागासंप्रदायातील तो एक साधुपुरुष! दक्षिणेश्वर मंदिरातील नगारखान्यात रात्रीच्या वेळी त्याने रामकृष्णाला संन्यासाची दीक्षा दिली, असे पृ. ५२ वर म्हटले आहे; तर 'हा विधी पंचवटीतील एका कुटीरात पार पडला आहे,' असे पृ. ५३ वर म्हटले आहे, यानेच त्याला रामकृष्ण असे नाव दिले, असे पृ. ५३ वर म्हटले आहे; तर पृ. ५२ वर मथुराबाबूंनी या नावाचा प्रथम उच्चार केला, असे म्हटले आहे...... करंदीकरांना व्याख्यानाच्या ओघात आपण एकदा काय म्हटले आणि नंतर काय म्हणतो, याचा कधीकधी विसर पडतो. उदा., पृ. २०९ वर ते म्हणतात– 'आपल्या शिष्यांनी रीतसर संन्यास ग्रहण केला, याचा रामकृष्णांना आनंद वाटला हे खरे!' पण विवेकनंदांनी इतर १२ जणांसह संन्यास घेतला, तो रामकृष्णांच्या निर्वाणानंतर– जाने. १८८७ साली.

रामकृष्णांच्या जीवनाचे थोडक्यात सार– 'प्रथम मातेच्या दर्शनासाठी केवळ आक्रोश, व्याकुळता, नंतर तिचे प्रकाशमय दर्शन, हळूहळू अधिक दर्शनें, तिचे सततचे सान्निध्य, तिच्या सहवासातच वावरत असल्याची नित्याची जाणीव, त्यानंतर भैरवीचे आगमन, तिच्या मार्गदर्शनाखाली साकाराच्या उपासनेतील विविध साधना, मंत्रशास्त्रातील साधना, त्यातील नाना अनुभव, अखेर तोतापुरीच्या मार्गदर्शनाखाली निराकाराचा अनुभव आणि त्यानंतर त्या एका अद्वैतानुभवाचा अखंड आस्वाद–अशा क्रमाने रामकृष्ण जीवनातील पूर्णतेचा सोपान पायरीपायरीने चढत गेले, असे सांगता येईल.

'**भावसुखी रहा**–' हा रामकृष्णांचा संदेश डॉ. करंदीकरांच्याच शब्दांत– 'याचा अर्थ असा की, सर्व भावांचा, अनुभवांचा जेथे एका अद्वैताच्या भावात किंवा अनुभवात केवळ लोप होऊन जातो, तेथे दुसरे असे काहीच उरत नाही. किंबहुना एकच आहे असे सांगणारेही कुणी राहात नाही, किंवा तसे सांगण्यासारखी अवस्था असत नाही. त्या अवस्थेत न राहता द्वैताने नटलेल्या या जगात अनेक अनुभव घेत राहा, म्हणजेच हा सारा जगताचा पसारा हा त्या एकाचाच विलास आहे, असा अनुभव घेत राहा. या आदेशाचा खराखुरा अर्थ पत्करावयाचा असेल तर त्याच्याशी सुसंगत असा, आपल्या इंद्रियांना भासमान होणाऱ्या या विश्वाच्या स्वरूपाचा तात्त्विक उलगडा करावा लागेल. या आदेशाशी सुसंगत असा विश्वस्वरूपविषयक सिद्धांत पत्करावा लागेल व तसा तो रामकृष्णांनी पत्करला होता–

'निखळ अद्वैताचा अनुभव पुरेसा मिळाल्यावर या जगाच्या व्यवहारात विशेष भावांचा, रसांचा अनुभवांचा आस्वाद घेत राहा', असाही संदेश रामकृष्णांनी दिलेला आढळतो. वस्तुतः निराकाराच्या–अद्वैताच्या अनुभवानंतर रामकृष्णांची साधना समाप्त झाली (पृ. ६१). हे म्हणणे स्वामींच्या उत्तरआयुष्याकडे पाहिले असता पटते.

डॉ. करंदीकर रामकृष्ण-विवेकानंदांवर भक्तिभावाने इतके फिदा झाले आहेत की, काही ठिकाणी त्यांनी केलेली तुलना सुजाण मनाला खटकेल, असे वाटते– उदा., पृ. ५१५ वर 'भारतामध्ये कित्येक शतकांत अशा प्रकारे धर्माला सेवेची, अध्यात्माला ऐहिकेची, भक्तीला ज्ञानाची आणि ज्ञानाला कर्माची जोड देण्याचा प्रयत्न एवढा प्रभावीपणे कोणी केला नव्हता'; किंवा 'ज्ञानेश्वर आणि रामकृष्ण हे दोघे आध्यात्मिक धारणेच्या आणि संवेदनशीलतेच्या दृष्टीने एकाच पातळीवर वावरणारे समानशील पुरुष मानता येतील.' आणखी एक उदाहरण– अभंगांतील सगुणभक्तीची आर्तता व माधुर्य आणि त्याचबरोबर निर्गुण निर्विकल्पाशी तदात्म होणारे ज्ञानदेव, अनुभवामृतातील अमृतरूप अनुभव– त्याच्याशी तद्रूप झालेले ज्ञानदेव, आध्यात्मिक अनुभूतींच्या त्या निरंतर स्पर्शाने ज्यांचे मन सदैव एका अपार्थिव पातळीवर

अनुक्रमणिका

वावरत आहे अशा "– ज्ञानेश्वरांशी– रामकृष्णांची तुलना करण्याचा त्यांचा मोह अनावर होतो.

तसं पाहिलं तर; रामकृष्ण आणि विवेकानंद हे भिन्न प्रकृतीचे पिंड आहेत. विवेकानंदांनी रामकृष्णांचे शिष्यत्व पत्करले; पण ते त्या केवळ भवसमाधीत चिकटून राहिले नाहीत. त्यांची दृष्टी समाजाभिमुख आणि अधिक सेवाभावी होती. म्हणूनच ते अखंड हिंडत राहिले. मिशनचे देशव्यापी कार्य हाती घेऊन ते मार्गी लावणारी सेवाभावी शिष्यपरंपरा त्यांनी निर्माण केली. त्यांनी दिलेले संदेश कालाशी सुसंगती साधणारे होते. ते म्हणतात, 'लाखो स्त्रीपुरुष पावित्र्याच्या तेजस्वी मंत्राची दीक्षा घेऊन आणि ईश्वरावरील दृढ श्रद्धेचे कवच धारण करून, पतित व पददलित अशा लोकांविषयी वाटणाऱ्या सहानुभूतीतून निर्माण झालेल्या सिंहसदृश प्रेरणेने समग्र भारतात भ्रमण करोत आणि मुक्ती, सेवा तशीच समाजाची उन्नती आणि समता यांचा मंगलमय संदेश घरोघर पोचवोत' (पृ. ४१३)

या सामाजिक उन्नतीच्या जाणीवेबरोबरच ज्वाज्वल्य देशभक्तीचे त्यांचे उद्‌गारही रामकृष्णांपेक्षा पृथक्त्व दाखवितात.– "तुमच्या हृदयात तळमळ आहे काय ? देवतांचे आणि ऋषींचे वंशज आज पशुतुल्य बनले आहेत, हे बघून तुमच्या हृदयाला पीळ पडतो काय ? कोटयावधी लोक आज भुकेने तडफडत आहेत, आज नव्हे, शेकडो वर्षांपासून ते तसे तडफडत आहेत, हे पाहून तुमच्या हृदयाला घरे पडतात काय ? आपला देश अज्ञानाच्या काळयाकुट्ट मेघांनी भरून गेला आहे, हे बघून तुमचे हृदय पिळवटून जाते काय ? त्यामुळे तुम्ही अस्वस्थ झाला आहात काय ? तुमची झोप उडाली आहे काय ? देशाच्या दुर्दशेच्या या चिंतेने आपला नावलौकिक, आपली बायकामुले, आपली धनदौलत, एवढेच नव्हे तर, आपले स्वतःचे शरीर, याचा तुम्हाला विसर पडला आहे काय ? देशभक्त होण्याची ही पहिली पायरी आहे' (पृ. ४१४).

निवृत्ती बाजूला ठेऊन विवेकानंदांना प्रवृत्तीच्या प्रदेशात उतरावे लागले आणि आपल्याबरोबर आपल्या गुरुबंधूंनाही तोच मार्ग कसा श्रेयस्कर, हे गळी उतरवावे लागले, यातच विवेकानंदांचा रामकृष्णांपेक्षा वेगळा मार्ग ठळकपणे नजरेत भरतो.

डॉ. वि. रा. करंदीकरांनी अपार परिश्रम घेऊन सिद्ध केलेल्या या संहितेबद्दल मराठी भाषारसिक त्यांचे सदैव उतराईच राहतील !

**ना. बा. मराठे**



## वाद–संवाद

संपादक,
'नवभारत'
प्र. न. वि. वि.

आपण माझा 'धर्मांतरपूर्व महारांच्या विवाहातील' हा लेख ( मार्च १९५५) प्रसिद्ध केल्याबद्दल मनःपूर्वक धन्यवाद. आपण पाठविलेल्या लेखाच्या छापील प्रती व पाठोपाठ अंकदेखील प्राप्त झाला.

लेखात प्रत्येक गीताच्या शेवटी 'ला' व 'बा' असे शब्द टाकलेले आहेत. त्याचा खुलासा चुकून राहिला, तो शक्य असल्यास पुढील अंकात छापावा :

'धर्मांतरपूर्व महारांच्या विवाहातील सोहळे' या लेखात समाविष्ट केलेल्या प्रत्येक गीताच्या शेवटी 'ला' व 'बा' ही अक्षरे छापलेली आहेत. ही दोन्ही अक्षरे पोटजातीवाचक आहेत. 'ला' अक्षर 'लाडवन' पोटजातीकरिता व 'बा' हे अक्षर 'बावने' पोटजातीकरिता समजावे. म्हणजे ते गीत त्या पोटजातीचे समजावे. लाडवन जातीची गीते ही बारके व झाडेबावने याही पोटजाती गात असत. मात्र बावने पोटजातीची गीते अन्य पोटजातींत प्रचलित नव्हती. सुमारे ३० वर्षांपूर्वी ठेवलेल्या नोंदींच्या आधारे हा लेख तयार करण्यात आल्यामुळे चोखंदळ वाचकांनी यातील चुका नजरेस आणून दिल्यास लेखक त्याचे स्वागत करेल.'

आपला-
**वसंत मून**






संपादक, 'नवभारत', वाई.

सप्रेम नमस्कार,

धर्मांतरपूर्व महारांच्या विवाहातील सोहळे (ले. वसंत मून) या 'नवभारता'तील (मार्च ८५) लेखाच्या तळटीपेत महार समाजातील फक्त आठ पोटजातींची नावे निर्दिष्ट केली आहेत.

माझ्या माहितीप्रमाणे महारातील १२½ पोटजाती पुढीलप्रमाणे :

१) सोमवंशी, २) लाडवण, ३) आंधवण, ४) तिळवण, ५) बावणे, ६) झाडण्या, ७) पोचऱ्या, ८) बलयी, ९) बनकर, १०) आंडकुळया, ११) कटई, १२) व्हलर आणि (१२½) ढेऱ्या. ढेऱ्या ही संख्येने फार कमी आहे; म्हणून तिला अर्धी जात मानतात.

कळावे.

–सतीश कुलकर्णी

○ ○

## भोपाळ दुर्घटना : एक काव्यरूप प्रतिक्रिया . . .

आता त्याच त्याच
कीटकांना मारायचे
म्हणून थोडा बदल झाला
येवढेच !
कोणी म्हणाले, त्या
मल्टीनॅशनलवाल्यांना हे
रात्रीच्या गाढ झोपेतले लोकच
कीटक वाटले
काळकामवेगवाले म्हणाले,
'एका टाकीतून एका तासात
१ टन वायू सोडला तर
५००० हजार माणसे मरतात
व १ लाख जखमींना तात्पुरते उपचार
करून पाठवितात;
तर मेलेल्यांचे जखमी झालेल्यांशी
गुणोत्तर प्रमाण किती ?'
आयुर्वेदाचार्य म्हणाले,
'भोपाळच्या शरीरात वायूचा
प्रकोप झाला.
त्रिदोष चिकित्सेप्रमाणे
वातप्रकोप झाला असता
धाप लागणे, मळमळणे, उलट्या होणे
इ. संभवते'......
धर्मगुरूंनी राजास
पत्र पाठविले ते येणेप्रमाणे
अनेक आशीर्वाद,
आपल्या रयतेतील काही हजार माणसांस
घुसमटल्याने देवाज्ञा झाल्याचे कळले
ईश्वरी इच्छेपुढे इलाज चालत नसतो
आपणास इजा झाली नाही हे ऐकून समाधान वाटले
सोबत अंगारा पाठविला आहे
कळावे.....
शेअर होल्डर म्हणाले,
'आम्ही रोजच्या व्यवहारास जबाबदार नाही
लाभांश व चढउतार यापलीकडे आमचा
यात संबंध नाही'
तरीही त्यातले काही
आचार्य मुनिसागरांकडे गेले
पापाच्या दायित्वाबद्दल क्षमायाचना करू लागले
व्रतस्थ मुनि म्हणाले,
'तुर्त शेअर्स विकू नका
पण कंपनीचे औषध मात्र
घरात ठेवू नका
इति......'
काही लोक चिडून म्हणाले,
'हा कारखाना हलवा येथून
तर ते मल्टीनॅशनलवाले म्हणाले,
'याद राखा तुमची हवा बंद करीन
शेवटी बहुमताने
त्या जागेवर विज्ञानाचे
स्मारक बांधायचे ठरले !

– अशोक आपणावकर







# सार-संकलन

## निधर्मी राज्याचे काही उन्मेष

१) सुलेखा बिबी ही भारतीय नागरिक केरळ राज्यातील बीमापल्ली ह्या खेड्यात राहते. ती धर्माने मुसलमान आहे. तिचा नवरा वहीद हा नोकरीच्या निमित्ताने अबू दाबी येथे असतो.

एप्रिल महिन्यात बीमापल्लीच्या जमातीने, म्हणजे मुसलमानांच्या पंचायतीने, सुलेखा बिबीने व्यभिचार केला आहे आणि दारू पिण्याचे दुष्कृत्य केले आहे, ह्या आरोपांखाली तिला १०१ फटके द्यावे, आणि तिचे केस भादरावे अशी शिक्षा फर्माविली. ह्या-शिवाय तिने दंडही भरायचा होता. हे आरोप सुलेखा बिबीने नाकारले. आपली बायको निर्दोष आहे, अशी वहीदचीही खात्री होती. तिला शिक्षा फर्माविण्यात आली आहे, ही बातमी त्याला समजली तेव्हा तो भारतात परतला. सुलेखा बिबीने शिक्षा भोगण्याचे नाकारले. ह्याबद्दल जमातने तिच्या कुटुंबावर सामाजिक बहिष्कार घालण्याचा आदेश दिला.

वर्तमानपत्रांनी ह्या बातमीला प्रसिद्धी दिली. जमातचे सचिव श्री. जाफर हे कनिष्ठ पोलिस अधिकारी आहेत. भारताच्या निधर्मी कायद्यांची अंमलबजावणी करण्याचे कर्तव्य ते पार पाडीत असतात, ह्या गोष्टीवर भर देण्यात आला. सरकारच्या दृष्टीने ह्या बातमीला मिळालेली प्रसिद्धी फार अडचणीची होती. जमातने चालविलेल्या उप-सरकारचे काय करणार हा त्यांच्या पुढचा प्रश्न होता. बीमापल्लीचे आणि आजूबाजूच्या प्रदेशाचे जनमतही सुलेखा बिबीच्या बाजूचे होते. तेव्हा जमातने पूर्वी फर्माविलेली शिक्षा सौम्य करण्याचे ठरविले. पण सुलेखा बिबी आणि तिचा नवरा ह्यांची मागणी शिक्षा रद्द करावी आणि सुलेखा बिबीची सार्वजनिक रीतीने क्षमा मागण्यात यावी अशी होती. आणि तिच्यापासून हटायला ते तयार नव्हते. अखेरीस बऱ्याच वाटाघाटीनंतर वहीद यांनी जमातला अशी विनंती केली की, तिने सुलेखा बिबीला फर्माविलेल्या शिक्षेचा फेरविचार करावा. जमातने एक समिती नेमून सुलेखा बिबीवरील आरोपांचा फेरविचार करविला. ते निराधार आहेत असा समितीने निर्णय दिला. जमातने पूर्वी फर्माविलेली शिक्षा रद्द केली. ह्या आशयाचे पत्र श्री. जाफर ह्यांनी बातमीदारांना प्रसिद्धीसाठी दिले.

ज्याचा शेवट गोड ते सर्व गोड असे म्हणता येईल. पण ह्या बातमीचे तात्पर्य असे की, जमातने ह्यावेळेला पड खाल्ली तरी तिचे उपसरकार अबाधित राहिले.

२) गेल्या एप्रिल २४ ला भारताच्या वरिष्ठ न्यायालयाने क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या १२५ कलमाखाली घटस्फोटित मुसलमान बायकोला तिच्या पूर्वीच्या नवऱ्याकडून पुरेशी पोटगी मिळण्याचा हक्क आहे, असा निर्णय दिला. ह्या निर्णयाचा निषेध करण्यासाठी शनिवार, ता. २२ जून रोजी मुंबईतील मुसलमान व्यापाऱ्यांनी 'बंद' पाळला. क्रॉफर्ड मार्केट ते जे. जे. हॉस्पिटल ह्या विभागातील मुसलमानांची दुकाने बंद होती.

'अखिल भारतीय मुस्लिम वैयक्तिक कायदा मंडळ' ह्या संघटनेचे सचिव श्री. अब्दुस सत्तार युसुफ शेख ह्यांनी ह्या निर्णय म्हणजे मुसलमानांच्या कायद्यामध्ये—शरियतमध्ये— ढवळाढवळ करण्याचा स्पष्ट प्रयत्न आहे अशी तक्रार केली. क्रिमिनल प्रोसिजर कोडाच्या १२५ कलमात बदल करण्यात यावा आणि भारतीय घटनेच्या ४४ व्या कलमापासून-म्हणजे समान नागरी कायद्यापासून-मुसलमानांना वगळण्यात यावे, अशी श्री. शेख ह्यांनी मागणी केली आहे. थोडक्यात ह्या मागणीचा अर्थ असा की, भारतीय मुसलमानांना भारतीय कायदे लागू करण्यात येऊ नयेत, त्यांना फक्त पारंपरिक मुस्लिम कायदे लागू करण्यात यावेत.

अनुक्रमणिका

## भारतीय अणुशस्त्रे : एक पाकिस्तानी दृष्टिकोण

"जून महिन्यापासून श्री. राजीव गांधी ज्या मुलाखती देत आहेत, किंवा वार्ताहर-परिषदांत व अन्यत्र जी विधाने करीत आहेत, त्यांवरून भारताने अणु-शस्त्रे बनविण्याचा निर्णय घेतला आहे, हे स्पष्ट झाल्यासारखे आहे. राजीव गांधी करीत असलेली विधाने म्हणजे भारत अणु-शस्त्रे बनविणार आहे, हे जाहीर करण्याचा एक अनधिकृत मार्ग आहे, असे म्हणता येईल.

उपचार म्हणून श्री. गांधी असे म्हणत आहेत की, पाकिस्तानने अणु-बाँब बनविला तरी आहे किंवा अणुबाँब बनविण्याच्या खटपटीत ते आहे आणि त्यात त्याला कधीही यश येण्याची शक्यता आहे. तेव्हा अमेरिकेने ताबडतोब आवश्यक ते उपाय योजून पाकिस्तानला अणु-सत्ता बनण्यापासून प्रतिबंध केला पाहिजे. जर पाकिस्तानने अणु-बाँब बनविला तर "खेळाचे सर्व नियम बदलतील. ह्या गोष्टींचा आपण काळजीपूर्वक विचार केला पाहिजे... जर इस्लामाबादने बाँब बनविला तर भारताला आपल्या सर्व धोरणांचा पुनर्विचार करावा लागेल ... (भारताने अणुशस्त्रे बनविण्याचा निर्णय घेतला तर) काही आठवड्यांत किंवा महिन्यांत भारत अणु-सत्ता बनेल... इ." ह्या वक्तव्यापासून मिळणारा संदेश स्पष्ट आहे.

अमेरिकेकडून ह्या संदेशाला इष्ट तो प्रतिसाद मिळालेला दिसत नाही. अणु-अस्त्रे बनविण्यापासून पाकिस्तानला परावृत्त करण्याची इच्छा तरी अमेरिकेला नाही किंवा कुवत तरी नाही, असेच म्हणावे लागते. तेव्हा भारत थोड्याच काळात अणु-सत्ता जगातील सहावी अणु-सत्ता, बनेल असे दिसते.

ह्यामुळे भारताचा काय फायदा होणार आहे ? समजा भारताने अणु-शस्त्रे बनविली, तर भारत–पाकिस्तान संबंधावर त्यांचे काय परिणाम घडून येतील ? पाकिस्तानमधील भारताविरुद्ध 'कडक' धोरणाचा अवलंब करावा म्हणून युक्तिवाद करणारी नेहमीची मंडळी म्हणतील की, आम्ही तुम्हाला सांगतच होतो. भारत आता अणुसत्ता बनला आहे. आपल्याला अणु-शस्त्रे बनविण्यावाचून गत्यंतर नाही. ' तेव्हा आज पाकिस्तान जे करीत आहे असा भारताला संशय आहे, ते पाकिस्तान निर्धाराने करील. आणि भारत आपला शत्रू आहे ही भावना पाकिस्तानात बरीच पसरलेली असल्यामुळे सरकारच्या ह्या धोरणाला व्यापक पाठिंबा राहील. भारत जे, जे करील ते ते पाकिस्तानने केलेच पाहिजे, ही भूमिका अमान्य करणारे बरेच लोक पाकिस्तानात आहेत. परंतु एकदा अणु-शस्त्रांची स्पर्धा दोन्ही देशांत सुरू झाली की, तिला विरोध करणे अधिकाधिक कठीण जाईल.

समजा, पाकिस्तानकडे गुप्तपणे अगोदरच काही अणुबाँब आहेत. ह्यामुळे भारताच्या दृष्टीने काय फरक पडतो ? चीनकडेही बरीच वर्षे अणु–शस्त्रे आहेत. आणि भारत व चीनमध्ये शत्रुत्वाचे नाते बराच काळ आहे. ( आता ते काहीसे सौम्य होते आहे. ) हे सर्व असताना भारताने अणु–अस्त्रे न बनविण्याच्या आपल्या धोरणात बदल केला नव्हता. मग पाकिस्तानकडे काही अणुबाँब आहेत, अशी परिस्थिती निर्माण झाल्यामुळे भारताच्या दृष्टीने असा काय बदल झालेला असेल, की ज्याच्यामुळे भारताला अणु–शस्त्रे बनविणे भाग पडावे ?

पाकिस्तानने जरी काही अणुबाँब बनविले तरी आवश्यक ती 'वितरण–व्यवस्था'– बाँबवाहू विमाने, क्षेपणास्त्रे, इ.– निर्माण करण्याची कुवत पाकिस्तानमध्ये नाही. किंवा अणु–शस्त्रांच्या निर्मितीचा कार्यक्रम पार पाडण्यासाठी जो वैज्ञानिक व अभियांत्रिक पाया लागतो, तो पाकिस्तानकडे नाही. तेव्हा पाकिस्तानने काही अणु–बाँब बनविले म्हणून भारताला दहशत वाटण्याचे कारण काय ? हे बाँब पाकिस्तानकडे आहेत म्हणून पाकिस्तान मागेल ते भारताला निमूटपणे द्यावे लागेल अशी परिस्थिती निर्माण होईल का ?

समजा भारताने अणु–शस्त्रे निर्माण केली. ह्यामुळे भारताची प्रतिष्ठा वाढली असेही मानूया. ह्या वाढलेल्या प्रतिष्ठेचे गमक काय ? उदा. श्रीलंका, ह्या वाढलेल्या भारतीय प्रतिष्ठेमुळे, लगेच भारताच्या इच्छेप्रमाणे, वागू लागेल का ? बांगला देश कमी त्रासदायक ठरेल का ? पाकिस्तानचे परराष्ट्र धोरण आपोआप भारताला अनुकूल होईल का ?

भारताने अणु-शस्त्र बनवावी असा आग्रह धरणारे अनेक भारतीय आहेत. अणुशस्त्रांच्या निर्मितीच्या बाजूचा एक युक्तिवाद असा की, ह्या वैज्ञानिक–तंत्रज्ञानात्मक कार्यक्रमामुळे देशात उच्च तंत्रज्ञानाचा विकास होतो, ह्या तंत्रज्ञानावर आधारलेले अनेक उद्योगधंदे वाढतात आणि ह्यामुळे आर्थिक विकासाला जोराची चालना मिळते. पण ह्या युक्तिवादात एक महत्त्वाचा तर्कदोष आहे. कारण, उच्च तंत्रज्ञानाचा वापर करणारे हे उद्योग जर अणु–शस्त्रांच्या निर्मितीसाठी लागणारी साधनसामग्री प्रामुख्याने बनवीत असले, तर ते चालू ठेवण्यासाठी अणु–शस्त्रांची निर्मितीही सातत्याने चालू ठेवावी लागेल. म्हणजे नागरीजीवनासाठी त्यांचा फायदा होणार नाही. उद्योगांच्या ह्या विकासाचे फळ अणु–शस्त्रांचा वाढता साठा ह्या स्वरूपातच लोकांच्या पदरात पडेल. उलट स्वतंत्रपणे उच्च तंत्रज्ञानाचा वापर करणारे उद्योग विकसित करण्याच्या आड कुणीही येऊ शकत नाही. आणि अशा स्वतंत्ररीतीने ते विकसित केले तर नागरिकांना अधिक सुखसोयी पुरविण्याच्या कामी ते लावण्यात येतील.

भारताने अणुशस्त्रे बनविली तर, शेजारच्या देशांना भारताची धास्ती वाटायला लागेल ह्यात शंका नाही. ह्या परिस्थितीत परस्पर सहकार्य आणि सामंजस्य ह्या गोष्टी संपुष्टात येतील. ह्या प्रदेशातील देशांनी शांततेने, परस्परांना साहाय्य करून असला सामूहिक व वैयक्तिक विकास साधावा, ह्या वृत्तीने एकमेकांशी वागावे हे स्वप्न कायमचे भंगेल.

राष्ट्राला अणु–अस्त्रे निर्माण करता आली तरी त्यांच्यावर अमाप पैसा खर्च करावा लागत असला तरी, त्याच्या बदल्यात राष्ट्राला सुरक्षितता लाभते असा जो विचार आहे तो भ्रामक आहे. कारण अणु-अस्त्रांचा वापर हा अंतिम उपाय आहे, त्याचा वापर करण्याची पाळी शक्यतो येऊ नये ह्यासाठी 'पारंपरिक' शस्त्रास्त्रांची आणि मोठ्या सैन्याचीही सिद्धता ठेवावी लागते. म्हणजे अणु–अस्त्रांवर खर्च व्हायचा तो होतोच आणि नेहमीच्या सैन्यांवरचा आणि शस्त्रांवरचा खर्च कमी होत नाही.

आणखी एका प्रश्नाचा विचार केला पाहिजे. कोणत्याही देशात शस्त्रास्त्रांचे उत्पादन वाढावे, नवीन शस्त्रे निर्माण करावी ही मागणी लष्कर आणि उद्योग यांच्या युतीकडून होते. ही युती जर फार बलिष्ठ झाली तर तिच्यापासून लोकशाहीला धोका संभवतो. जर लोकशाहीने समाजात घट्ट मूळ धरलेले नसेल तर हा धोका अधिकच तीव्र असतो.

ह्या संदर्भात अणुशस्त्रे बनविण्याच्या समर्थतेपासून पाकिस्तान अजून खूप दूर आहे असे अमेरिकन अधिकाऱ्यांनी भारतीय पुढाऱ्यांना आश्वासन दिले आहे असे समजते. श्री. राजीव गांधी ह्यांनी आपल्या अलीकडच्या अमेरिका-भेटीत अमेरिकेकडून पाकिस्तानला मोठ्या प्रमाणावर अत्याधुनिक शस्त्रास्त्रांच्या होणाऱ्या पुरवठ्याचा प्रश्न वारंवार उपस्थित केला होता. पाकिस्तान अणु-शस्त्रनिर्मितीच्या प्रयत्नात असताना त्याला अशी शस्त्रास्त्रांची मदत करणे अमेरिकन कायद्याच्या विरुद्ध आहे, हा मुद्दा भारतीय अधिकाऱ्यांनी अमेरिकन पुढाऱ्यांपुढे उपस्थित केला होता. पाकिस्तान अणुशस्त्र बनविण्याच्या उंबरठ्यापर्यंत येऊन पोचल्यामुळे अणु-शस्त्रांची निर्मिती भारत सरकारने हाती घ्यावी ह्यासाठी त्याच्यावर देशातील अंतर्गत दडपण वाढत आहे ही अडचणही ह्या अधिकाऱ्यांनी अमेरिकन नेत्यांपुढे मांडली होती.

पाकिस्तानच्या अणु–वैज्ञानिकांनी आपण कोणत्याही क्षणी अणु–बाँब बनवायला सिद्ध आहोत असे जाहीर केले आहे. तथापि अमेरिकन अधिकाऱ्यांनी भारतीय अधिकाऱ्यांना दिलेल्या माहितीप्रमाणे पहाता पाकिस्तान ह्या सिद्धतेच्या जवळपासही आलेले नाही असे म्हणावे लागते. भारतीय अधिकारी ह्या माहितीचे मूल्यमापन करीत आहेत.

### कामे करणारे सरकार

आपले सरकार केवळ कामे पार पाडणारे आहे असे नव्हे, तर ते जलद गतीने कामे उरकणारे सरकार आहे असा दावा पंतप्रधानांनी केला आहे. ह्या दाव्याच्या संदर्भात पुढील माहिती उद्‌बोधक ठरेल : पंतप्रधान परदेशाच्या दौऱ्यावर असताना एके दिवशी त्यांच्या सोबत परदेशी गेलेले मंत्री सोडून आणखी दहा मंत्री राजधानीबाहेर होते. पंतप्रधानांच्या गैरहजेरीत मंत्री तर राजधानीबाहेर गेले होतेच पण निदान तीन सचिवांनी थंड हवेच्या ठिकाणी जाण्यासाठी ही वेळ साधली होती.

अनुक्रमणिका

पंतप्रधान दिल्लीला परतल्यावर त्यांचे स्वागत करण्यासाठी अनेक प्रतिष्ठित व्यक्ती राजधानीत दाखल झाल्या होत्या. हर्याणाचे मुख्यमंत्री, महाराष्ट्राचे शिवाजीराव पाटील-निलंगेकर, उत्तरप्रदेशाचे मुख्यमंत्री हे डेरेदाखल झाले होते. अन्न आणि पुरवठा मंत्री राव बीरेन्द्रसिंग, माहिती आणि प्रसारण खात्याचे मंत्री, दळणवळण मंत्री, संसदीय कामकाजाचे मंत्री, उद्योग मंत्री, आरोग्य आणि कुटुंबनियोजन मंत्री, हे सर्व पंतप्रधानांच्या आगमनाच्या आदल्या दिवशी राजधानीला परतले.

एका प्रमुख पुष्पविक्रेत्याने असे सांगितले की, त्याच्याकडून २४ पुष्पगुच्छ मागविण्यात आले होते. " प्रत्येक मंत्री आता दोन पुष्पगुच्छ मागवितात. एक राजीवसाठी व दुसरा सोनियासाठी."





अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

